# नवभारत

वर्ष २१ वे ] फेब्रुवारी १९६८ [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकविसावे

अंक पाचवा

# नवभारत

फेब्रुवारी १९६८

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक, ' गणेश भुवन ' २७६, तेलंग रोड, माटुंगा– मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर १८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ]    [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट्. (पॅरिस)

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनी पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधी व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीर्घनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, कीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचे ठिकाण—

**प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई** (सातारा)

प्रा. क. वा. केळकर

# भूशास्त्र का भूगर्भशास्त्र ?

कोयनानगरचा भूकंप झाल्यावर त्या भागातील घडामोडींच्या बातम्यांप्रमाणेच त्या भूकंपाची संभाव्य कारणे देणारे अनेक लेख आपल्या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकी फक्त मराठी लेखांवरून सुचलेले काही विचार येथे देत आहे. त्या लेखांपैकी पुष्कळसे लेख शास्त्रीय दृष्टीने व बरेच परिश्रम करून लिहिलेले आहेत. त्यांच्यातील मजकुरासंबंधी काहीच म्हणावयाचे नाही. पण त्यांच्यातील पारिभाषिक संज्ञांपैकी कित्येक अनुचित किंवा संदिग्ध असल्यामुळे लेख जितके उपयुक्त ठरावेत तितके ठरत नाहीत व काही संज्ञा अशा आहेत की त्यांच्यामुळे गैरसमजही निर्माण होण्याचा संभव आहे. अशांची काही उदाहरणे येथे देत आहे. केवळ बातम्या देणाऱ्या किंवा शास्त्रीय लेखात सामान्यतः वापरला गेलेला भूगर्भ हा शब्द घ्या. गर्भ याचा येथे लागू पडणारा अर्थ गाभा, गाभारा, अंतर्गृह असा होतो (भ्रूण, सारखे इतर अर्थ येथे लागू पडत नाहीत.)

आपले विज्ञानविषयक ज्ञान बहुधा इंग्रजीच्या (क्वचित् इतर युरोपीय भाषांच्या ) द्वारे मिळालेले आहे. म्हणून येथे सामान्यतः परिचित अशा इंग्रजी भाषेतील संज्ञांची उदाहरणे घेऊ.

इंग्रजीतील जिऑलजी या शब्दाशी समानार्थी अशा रीतीने भूगर्भशास्त्र हा शब्द वापरला जातो. जिऑलजी हा शब्द पृथ्वी विषयीचे शास्त्र या अर्थाने प्रथम वापरण्यात आला (१७५५), पण लवकरच असे कळून आले की आपण पृथ्वीच्या उथळ भागाचेच परीक्षण करू शकतो. म्हणून पृथ्वीच्या कवचाचे शास्त्र अशा अर्थाने तो वापरण्यात येऊ लागला (१७९५). ऑक्सफोर्ड, चेंबर्स इत्यादी सामान्य इंग्रजी शब्दकोशात जिऑलजी म्हणजे पृथ्वीच्या कवचाचे (अर्थस् क्रस्ट चे) शास्त्र एवढाच अर्थ दिलेला आढळतो. जिऑलजीचे सरळ सरळ मराठी भाषांतर भूशास्त्र किंवा भूविज्ञान असे होईल. पण कित्येकांना आखूड साधे पारिभाषिक शब्द आवडत नसावेत. म्हणून भूगर्भशास्त्र असे नाव ते वापरीत असतात. लांब, तोंडभर शब्द पाहिजे असला तर कवच, पटल, वल्क, बाह्यावरण, त्वचा यासारखे शब्द वापरून भूकवचशास्त्र भूपटलशास्त्र इत्यादी शब्द वापरता येतील. 'भूगर्भ' हा शब्द वापरल्याने कोणत्या अडचणी येतात व तो का अनुचित आहे हे पाहू. पृथ्वीच्या उथळ भागाचीच पाहणी आपण करू शकतो, व पृथ्वीच्या पृष्ठावर किंवा पृष्ठालगतच्या भागात होणाऱ्या नैसर्गिक घडामोडींचे अध्ययन हे भूविज्ञानाचा (जिऑलजीचा) महत्त्वाचा भाग आहे व "आजच्या घडामोडींचे अध्ययन हे पृथ्वीचा गत इतिहास जाणण्याची गुरुकिल्ली आहे." हे भूविज्ञानाच्या पायाभूत तत्त्वांपैकी एक आहे. आणखी असे की भूगर्भ म्हणजे कोणता भाग? पृथ्वीच्या कवचाखालचे पदार्थ आपणास पाहाता येत नाहीत. पण क्ष-किरणांनी शरीराची आंतरिक रचना कळून येते, त्याचप्रमाणे भूकंपतरंगांच्या साहाय्याने पृथ्वीच्या अंतर्भागाची रचना कळून येते. तिच्यावरून पाश्चिमात्य भूवैज्ञानिकांनी व भूकंपवैज्ञानिकांनी पृथ्वीचे पुढील तीन मुख्य भाग केलेले आहेत. (१) क्रस्ट म्हणजे घन पृथ्वीचे कमी अधिक जाडीचे बाह्य कवच; सरासरी जाडी सुमारे १५ कि. मी. (सुमारे ९ मैल.) (२) कवचाच्या खाली असलेला सुमारे २९०० कि. मी. (१९०० मैल) जाडीचा घन पदार्थाचा थर. त्याला मँटल (प्रावरण) म्हणतात व (३) त्याच्या खाली पृथ्वीच्या मध्याशी असलेला सुमारे ३५०० कि. मी. (२२०० मैल) त्रिज्येचा

गोल. त्याचे गुणधर्म द्रव पदार्थासारखे आहेत. त्याला कोअर म्हणजे गाभा म्हणतात. वास्तविक या भागाला गर्भ हे नाव योग्य ठरेल. भूगर्भ-शास्त्र हा शब्द (आधुनिक) इंग्रजी अर्थाच्या जिऑलजी या शब्दाचे भाषांतर आहे असे धरून चालले तर भूगर्भ म्हणजे पृथ्वीचे कवच असा अर्थ होईल; त्याचा व्यापक व जुना इंग्रजी अर्थ घेतला तर एकूण पृथ्वीचे विज्ञान असा होईल. आजच्या मराठी लेखातील भूगर्भ या शब्दाची निश्चित व्याख्या नसल्याने किती घोटाळे होतात ते पाहू.

ज्वालामुखींच्या स्फोटक उद्गिरणामुळे उद्भवणाऱ्या भूकंपांचे परिणाम अगदी मर्यादित क्षेत्रात होतात. ते भूकंप विशेष महत्त्वाचे गणले जात नाहीत. इतर भूकंप टेक्टॉनिक (सांरचनिक) म्हणजे कवचाच्या बांधणीमुळे किंवा रचनेमुळे उद्भवलेले असतात. अशांपैकी कित्येक तीव्र किंवा संहारक असतात. टेक्टॉनिक भूकंपांच्या उद्गम-स्थानाच्या (नाभीच्या = फोकस्च्या) खोलीवरून भूकंप-तज्ज्ञांनी त्यांचे पुढील वर्ग केलेले आहेत. (१) उथळ: नाभीची खोली ७० कि. मी. पेक्षा कमी. (कोयनेच्या भूकंपाची नाभी ३० कि. मी. होती अशी माहिती वेधशाळेत काम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या लेखात आहे व त्याची गणना उथळ भूकंपात करावी लागेल.) (२) मध्यम: नाभीची खोली ७० ते ३०० कि. मी. (३) खोल: नाभीची खोली ३००-७०० कि. मी.

गेल्या सुमारे ५० वर्षात नोंदल्या गेलेल्या भूकंपांपैकी ७५ टक्क्याहून अधिक भूकंप उथळ व सुमारे १८ टक्के मध्यम खोलीचे असल्याचे आढळले आहे. खोल नाभी असणाऱ्या म्हणजे पृथ्वीच्या एकूण, त्रिज्येच्या सुमारे एक दशांश-पेक्षा अधिक खोल नाभी असणाऱ्या भूकंपांची नोंद झालेली नाही. सारांश भूकंपांच्या नाभी पृथ्वीच्या कवचात किंवा प्रावरणाच्या उथळ भागातच असलेल्या आढळल्या आहेत. पृथ्वीच्या रचनेविषयी अशी निश्चित माहिती उपलब्ध झालेली आहे हे लक्षात घेतले तर मराठी लेखातील वर्णने अगदी मोघम व त्यामुळे निरर्थक वाटतात.

पृथ्वीचे कवच भेदून त्याच्याखाली असलेल्या पदार्थात शिरेल असे भोक पाडण्याचे प्रयत्न अलीकडे झालेले आहेत पण ते यशस्वी झालेले नाहीत, व कवचाच्या खाली कोणते पदार्थ आहेत याची निश्चित माहिती नाही. परंतु 'तज्ज्ञांची एक तुकडी कोयनानगर येथे भूगर्भाची पाहाणी करण्यासाठी जात आहे" किंवा "अणु बॉम्बच्या चाचणीसाठी भूगर्भात स्फोट केला" अशा ज्या बातम्या आपण वाचतो किंवा ऐकतो त्या अतिशयोक्त असतात. तज्ज्ञांच्या तुकडीने जमिनीच्या पृष्ठाचेच स्वरूप पाहिलेले असते व भूगर्भातील स्फोट म्हणजे जमिनीखालील पण कवचाच्या खडकातच केलेला असतो.

कोयनानगरचा भूकंप "भूगर्भातील हालचाली-मुळे" झाला किंवा त्याचे "कारण अतिखोल भूगर्भातच" असले पाहिजे अशा विधानातील भूगर्भ या शब्दाची निश्चित व्याख्या दिलेली नसल्यामुळे त्या विधानांनी काहीच बोध होत नाही. पृथ्वीच्या दृश्य अशा भागाखालील सर्व भाग असा भूगर्भ याचा अर्थ घेतला तर अतिखोल म्हणजे पृथ्वीच्या त्रिज्येच्या सुमारे अर्ध्या इतका किंवा त्याच्यापेक्षा म्हणजे पृथ्वीच्या जवळजवळ मध्याइतका खोल भाग होईल. भूगर्भ म्हणजे कोअर असा अर्थ घेतला तर अतिखोल भूगर्भ म्हणजे पृथ्वीच्या जवळ जवळ मध्याजवळचा भाग असा अर्थ होईल. कोणताही अर्थ घेतला तरी अशा खोल जागी असलेली "कारणे" व पृथ्वीच्या उथळ किंवा एकंदरीत उथळ म्हणजे पृथ्वीच्या एकूण त्रिज्येच्या $\frac{1}{10}$ पेक्षा कमी खोल भागात घडून येणारे भूकंप यांचा अन्योन्य संबंध कळणे कठीण आहे.

भूगर्भ या शब्दासारखा आणखी एक शब्द म्हणजे भूस्तर होय व कित्येक वेळा जिऑलजी या अर्थाने भूस्तरशास्त्र हा शब्द वापरलेला आढळतो. अशा उपयोगामुळे कोणती अडचण उद्भवते ते पाहू. स्ट्रॅटिग्रॅफी ही जिऑलजीची (भूविज्ञानाची) एक महत्त्वाची शाखा आहे.

स्ट्रटम म्हणजे थर व स्ट्रॅटिग्रॅफी म्हणजे स्तरित थरांच्या रूपात आढळणाऱ्या, खडकांविषयीचे विज्ञान, पृथ्वीच्या कवचाने सर्वच खडक स्तरित नाहीत. बहुसंख्य खडक स्तरित नसतात. भू-विज्ञानात सर्व प्रकारच्या खडकांच्या अध्ययनाचा समावेश होत असल्यामुळे त्याला भूस्तरशास्त्र हे नाव समर्पक नाही. शिवाय स्ट्रॅटिग्रॅफीसाठी एखादी संज्ञा वापरलीच पाहिजे व स्तर शास्त्र किंवा भूस्तरशास्त्र या संज्ञा अर्थात सरळ सरळ व योग्य ठरतात.

भूकंपासंबंधीच्या मराठी वर्तमानपत्रातल्या लेखांच्या मानाने इंग्रजी वर्तमानपत्रातील लेख अधिक चांगले असलेले आढळतात व नभोवाणीने प्रसारित केलेल्या मराठी व इंग्रजी वातम्यांसंबंधी तसाच अनुभव येतो.

कोयनेचा भूकंप व त्यासंबंधीचे लेख लवकरच विसरले जातील. शास्त्रीय विषयासंबंधी उत्सुकता असणारे बरेचसे वाचक मराठी लेखातून न कळलेली माहिती इंग्रजी पुस्तकांच्या द्वारे मिळवू शकतात. म्हणून अशा मराठी लेखांकडे विशेष लक्ष दिले नसते तरी चालले असते. परंतु लवकरच मराठी भाषा उच्च शिक्षणाचेही माध्यम होणार आहे. आपल्या पाठ्यपुस्तकात असे चुकीचे किंवा भोंगळ पारिभाषिक शब्द आले तर विद्यार्थ्यांची प्रगती होण्याऐवजी त्यांचे नुकसानच होईल. एखादा शब्द वारंवार वापरला गेला म्हणजे अनुचित असला तरी रूढ होऊन बसतो व त्याचे उच्चाटन करणे अशक्य होते. असे शब्द टाळले जावेत अशी सूचना करणे एवढाच या लेखाचा उद्देश आहे.

---

प्रा. वा. के. लेले

# प्राचीन व मध्ययुगीन भाषाभगिनींची परस्पर मैत्री

## सद्यःकालीन भाषिक अशान्तता–

गेली काही वर्षे भारतात भाषिक असन्तोष धुमसत आहे. भारतातील प्रांतांची भाषावार पुनर्रचना झाली तरीही हा असन्तोष कमी झालेला नाही. दोन-तीन वर्षांपूर्वी तमीळनाडमध्ये झालेली हिंदी-विरोधाची चळवळ सर्वांना अजूनही चांगली आठवते. लोकांच्या व्यवहारात असलेल्या हिंदी, मराठी, गुजराती, तेलुगु इत्यादी सर्व भाषांना भारतीय घटनेने मान्यता दिलेली असली तरी हिंदी भाषेला राष्ट्रभाषेचे स्थान दिले गेल्यामुळे इतर भाषिकांच्या मनात साशंकतेचे वातावरण उत्पन्न झाले आहे. हिंदी भाषा आपल्यावर लादली जाण्याची शक्यता असल्याची भावना अहिंदी-भाषिकांच्या मनात घर करून राहिली आहे. त्यामुळेच हिंदी–विरोधाची लाट मधूनमधून उसळते. अहिंदी-प्रांतामध्ये, विशेषतः दक्षिणेमध्ये, इंग्रजी ही परकीय भाषा असूनदेखील तिला विरोध नाही; उलट ती आणखी काही वर्षे भारतात टिकून राहावी अशी त्या प्रांतांची इच्छा आहे. उलटपक्षी, हिंदी-भाषिक प्रांतामध्ये इंग्रजीला तीव्र विरोधच आहे. केन्द्र सरकारने विद्यापीठीय उच्च शिक्षणाचे माध्यम म्हणून केन्द्रसंचालित विद्यापीठांमध्ये प्रांतीय भाषेबरोबरच इंग्रजीसही स्थान असावे असा निर्णय घेतल्याबरोबर हिंदी भाषा व साहित्य यांची सेवा करणाऱ्या एका प्रख्यात संस्थेने तातडीची बैठक घेऊन केन्द्र-सरकारच्या उक्त निर्णयाविषयी तीव्र नापसंतीच व्यक्त केली आणि हिंदी हीच भारताची संपर्क-भाषा होण्यास लायक आहे व तिचा इतर प्रांतीयांनी स्वीकार केला पाहिजे, असा ठरावही पास केला. ह्या इंग्रजी-विरोधाने इतके उग्र (व निषिद्ध) स्वरूप धारण केले की, हिंदी प्रांतातील एका प्रसिद्ध विद्यापीठातील सर्व इंग्रजी सूचना-फलकांवर चळवळ्यांनी डांबर फासले. इतकेच नव्हे, तर त्या विद्यापीठाच्या संस्थापकाच्या पुतळ्याखाली खोदलेल्या इंग्रजी मजकुरावर डांबर फासून त्या पुतळ्यास तर विशोभित केलेच, पण त्याखेरीज आपल्या हीन अभिरुचीचेही प्रदर्शन केले ! ह्याच हिंदी प्रांतामध्ये अन्यत्र अध्यापकांच्या एका सभेत काही हिंदी–भाषिक अध्यापकांनी अहिंदी–भाषिक अध्यापकांना 'तुम्ही ह्या प्रांतात राहण्यास लायक नाही,' असे बजावण्यासही मागे–पुढे पाहिले नाही असे कळते. अशाप्रकारे सध्या तरी देशामध्ये भाषिक प्रश्नावरून गरमागरम वातावरण निर्माण झाले आहे. ह्या गंभीर प्रश्नाकडे भारताचे राष्ट्रपती, शिक्षणमंत्री शिक्षणतज्ज्ञ, निरनिराळ्या विद्यापीठांचे उपकुलगुरू, शिक्षण–संस्था–प्रमुख इत्यादी सर्वांचे लक्ष वेधले गेले असून उच्च शिक्षणात माध्यमांतर कसे साधावयाचे, इंग्रजी–धार्जिण्यांचे मतपरिवर्तन कसे घडवून आणावयाचे, कोणत्याही एका भाषेचा अन्य भाषांवर वरचष्मा होऊ न देता सर्व भाषांचा विकास कसा साधावयाचा, आणि ह्या सर्व बिकट प्रश्नांची उत्तरे देशाचे ऐक्य अभंग राखून कशी शोधून काढावयाची ह्या प्रश्नांनी वरील सर्व विचारवंतांना त्रस्त करून सोडले आहे.

## अभ्यासकाच्या मनातील विचारतरंग

हा सर्व देखावा पाहून ग्रंथालयाच्या कोपऱ्यात बसून प्राचीन भारतीय साहित्य व संस्कृती यांचा अभ्यास करणाऱ्या निर्विकार व तटस्थ वृत्तीच्या चिकित्सकांच्या मनात पुढील विचारतरंग उत्पन्न होतात. भाषांची विविधता व विपुलता हे काही सद्यःकालीन भारताचे तेवढे वैशिष्ट्य आहे अशातला प्रकार नाही. प्राचीन व मध्ययुगीन भारतामध्येही लोकांचा व्यवहार अनेक भाषांमध्ये होत असे. वेदकाळातही बोली म्हणजे प्राकृत प्रचलित होती.[१] वेदकाळाइतक्या प्राचीनतम काळाचा विचार जरी बाजूस सारला तरी तदुत्तर

१. CHCL, 18. ग्रंथनामांसाठी वापरलेल्या ह्या सर्व संक्षेपांचा खुलासा लेखाच्या अखेरीस करण्यात आला आहे. संक्षेपासमोर लिहिलेला आकडा हा त्या ग्रंथाचा पृष्ठांक आहे.

काळातही महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची इत्यादी अनेक प्राकृत भाषा उदयास आल्याचे इतिहास सांगतो. खुद्द वैदिक संस्कृतीच्या पुनरुत्थापकांनी प्रारंभी-प्रारंभी संस्कृतच्या जोडीने प्राकृतांचाही पुरस्कार[१] केला. साहजिकपणेच महावीर व गौतमबुद्ध ह्या अवैदिकांनी आपापल्या धार्मिक प्रवचनांसाठी प्राकृत भाषांचाच आश्रय घेतला; महावीराने अर्धमागधी ह्या प्राकृत भाषेत आणि गौतमबुद्धाने मागधी प्राकृतात आपले धर्मोपदेश दिले.[२] प्राकृत ह्या बहुजन-समाजाच्या भाषा होत्या. त्या संस्कृतांच्या संस्कारांपासून व व्याकरणाच्या नियंत्रणापासून अलिप्त अशा सामान्य जनतेच्या भाषा होत्या. रुद्रटकृत काव्यालंकाराचा टिप्पणकार 'नमिसाधु' प्राकृतांचे स्वरूप विशद करताना म्हणतो– "सकलजगज्जन्तूनां व्याकरणादिभिरनाहितसंस्कारः सहजो वचनव्यापारः प्रकृतिः । तत्र भवं सैव वा प्राकृतम्। आरिसवयणे सिद्धं देवाणं अद्धमागहा बाणी ' इत्यादि वचनाद् वा प्राक्पूर्वं कृतं प्राकृतं बालमहिलादिसुबोधं सकलभाषानिबन्धनभूतं वचनमुच्यते। मेघनिर्मुक्तजलमिवैकस्वरूपं तदेव च देशविशेषात्संस्कारकरणाच्च समासादितविशेषं सत्संस्कृताद्युत्तरविभेदानाप्नोति। अत एव शास्त्रकृता प्राकृतमादौ निर्दिष्टं तदनु संस्कृतादीनि। "[३] मेघामधून पडणाऱ्या जलाप्रमाणे मुळात एकरूप असलेल्या आबालसुलभ प्राकृतालाच कालांतराने अनेक धुमारे फुटले व भिन्नभिन्न देशविभागात ती भिन्नभिन्न नावांनी ओळखली जाऊ लागली. उदा. महाराष्ट्रात प्रचारात असलेल्या प्राकृताला महाराष्ट्री म्हणत असत, आणि ही सर्वोत्कृष्ट प्राकृत-भाषा समजली जात असे.[४] सध्या बिहार ह्या नावाने ओळखला जाणारा प्रांत, वाराणसीच्या आसपासचा प्रदेश, तसेच यमुनाकाठावरील मथुरेच्या जवळपासचा भाग एवढ्या प्रदेशात शौरसेनी प्राकृताचा प्रचार होता.[५] पाण्ड्य, पाञ्चाल, गौड, मागध, इत्यादी ११ पिशाचज देश मानण्यात आले असून कैकय, शौरसेन व पाञ्चाल ह्या तीन पैशाची बोलींचा उल्लेख आढळतो.[६] वरील प्राकृताखेरीज प्राच्या, अवन्ती, शाकारी, चाण्डाली, शाबरी, टक्कदेशी, नागरक, ब्राचड, उपनागर इत्यादी अन्य अनेक बोलींचे वर्णन-विवरण प्राकृत व्याकरणांवरील ग्रंथांतून आढळून येते.[७] इसवी सन ४०० च्या सुमारास प्राकृतांची अपभ्रंश नावाची एक बोली उदयास आली व तिच्यामधून सध्या प्रचारात असलेल्या भारतीय भाषांची पूर्वरूपे उदयास आली.[८] ही पूर्वरूपे इसवी सन १००० च्या सुमारास स्थिरावली व त्यांना देशी भाषा हे नाव प्राप्त झाले.[९] प्राचीन मराठी, बंगाली, गुजराती, ब्रज इत्यादी भाषा त्यांच्या पूर्वीच्या अपभ्रंश भाषांमधून उत्क्रान्त झाल्या व लोकव्यवहाराच्या भाषा म्हणून नांदू लागल्या. एवंच, प्राचीन काळातील प्राकृत, तदुत्तरकालीन अपभ्रंश व मध्ययुगातील देशी भाषा लोकभाषा म्हणून मान्यता पावल्या होत्या व लोकांचे आहार-विहारादी यच्चयावत् व्यवहार त्या त्या भाषांच्या साह्याने पार पडत होते. त्याच काळात संस्कृत भाषाही जिवंत असून ती शिष्टांच्या, सुविद्यांच्या, सुसंस्कृतांच्या वाग्व्यवहाराची व साहित्याची भाषा होती हे लक्षात ठेवले पाहिजे. मग प्रश्न निर्माण होतो तो असा की, संस्कृत व प्राकृत-अपभ्रंश-देशी भाषा यांचे परस्पर

१. हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४०.

२. हालगाथा– प्रस्तावना खण्ड, ४२९; VHSL. 5.

३. रुकालं १३.

४. 'महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः । ' – काद. १–३४.

५. VHSL. 5.

६. प्रासाइ. २७–२९.

७. तत्रैव ६४०.

८. VHSL. 5.

९. VHSL. 15. ; प्रासाइ. ६९१–६९२. श्रीपतीच्या (शके ९२१ ते ९८०) 'ज्योतिषरत्नमाला' ह्या आद्य मराठी ग्रंथाचा काळ ह्या काळाशी जुळणारा आहे ( सारस्वत, ६६५ ).

संबंध कसे होते ? आज ज्याप्रमाणे भाषिक वादळ निर्माण झाले आहे, त्याप्रमाणे वादळ पूर्वीच्या काळातही उत्पन्न झाले होते का ? संस्कृत कवींना, विद्वानांना आश्रय देण्याच्या बाबतीत प्राचीन राजे प्रसिद्ध होते. त्यांची प्राकृत विद्वानांविषयी कोणती भूमिका होती ? प्राकृतात निर्माण झालेले साहित्य अध्ययनाचा विषय बनत असे काय ? असल्यास कोणाच्या ? संस्कृत पण्डित, प्राकृत पण्डित व विद्वान याचेविषयी आदर दाखवीत की अनादर ? संस्कृत पण्डितांनी कधी प्राकृत भाषेत ग्रंथरचना केली का ? की, प्राकृतांविषयी त्यांच्या मनात तुच्छतेची भावना होती ? तसेच प्राकृत विद्वानांचा संस्कृतज्ञांविषयी कोणता दृष्टिकोण होता ? संस्कृत-प्राकृत कवी परस्परांची प्रशंसा करीत असत की निन्दानालस्ती ? तसेच, प्राकृत काव्यांवर संस्कृत भाषेत ( शिष्टांच्या भाषेत ) टीका लिहून प्राकृताचा गौरव करण्याची बुद्धी संस्कृतज्ञांना कधीकाळी होत असे का ? हे व असेच अनेक प्रश्न, वर म्हटल्याप्रमाणे ग्रंथालयात निर्विकारपणे व अलिप्तपणे प्राचीन साहित्याचा अभ्यास करणाऱ्याच्या मनात उत्पन्न होतात. त्यांचीच उत्तरे शोधण्याच्या हेतूने प्रस्तुत लेख लिहिण्यात आला आहे. ह्या लेखात सर्वस्वी वाङ्मयीन पुरावेच सादर करण्यात येतील, हे सांगावयास नकोच.

## प्राकृत भाषा व राजाश्रय

ज्याप्रमाणे राजसिंह, कनिष्क, विक्रमादित्य, हर्षवर्धन, आदिशूर, यशोवर्मन्, लक्ष्मणसेन, सिंधुराज, माधवसिंह, इत्यादी राजांनी अनुक्रमे भास, अश्वघोष, कालिदास, बाणभट्ट, भट्टनारायण, भवभूती, जयदेव, पद्मगुप्त, व्रजनाथ इत्यादी संस्कृत कवींना आश्रय दिला, त्यांच्या काव्यांचे कौतुक केले, स्वतःही काव्य-नाटकांची रचना करून संस्कृत भाषेचे व वाङ्मयाचे वैभव वाढवले त्याप्रमाणेच अनेक प्राचीन व मध्ययुगीन राजांनी प्राकृत भाषा व साहित्य यांना उदार आश्रय दिला. हाल, कर्ण, प्रवरसेन, सर्वसेन, मान, देवराज, आढ्यराज, वाक्पतिराज, इत्यादी राजांनी व राजपुत्रांनी प्राकृत भाषेत गाथा, भावकाव्ये, महाकाव्ये, आख्यायिका इत्यादी ग्रंथ लिहून लोकभाषेचा पक्ष उचलून धरला.[१] हाल सातवाहनाने पालित नावाच्या कवीस आपल्या दरबारी ठेवले होते असे पुढील प्रसिद्ध उक्तीवरून म्हणता येते– ‘ हालेनोत्तमपूजया कविवृषा श्रीपालितो लालितः । ’ राजशेखराने[२] आपल्या काव्यमीमांसेमध्ये ‘ श्रूयते च कुन्तलेषु सातवाहनो नाम राजा; तेन प्राकृतभाषात्मकमन्तःपुर एवेति समानं पूर्वेण । ’ अशी एक जनश्रुती ह्या सातवाहनासंबंधी नमूद केली आहे. ती खरी मानल्यास सातवाहन राजा प्राकृतांचा कट्टा पुरस्कर्ता होता, असेच सिद्ध होते. आढ्यराज राजाच्या अमदानीत सर्व प्रजा प्राकृत भाषिक होत्या, असे जोगळेकर[३] नमूद करतात. काव्यपरीक्षेसाठी तयार केलेल्या सभागृहामध्ये कोणत्या भाषेचे कवी कोणत्या दिशेस बसत असत त्यासंबंधीची नोंद राजशेखराने पुढीलप्रमाणे केलेली आढळते– ‘...तस्यां राजासनम् । तस्य चोत्तरतः संस्कृताः कवयः निविशेरन् । ... ... पूर्वेण प्राकृताः कवयः ... । ... पश्चिमेनापभ्रंशिनः कवयः ...... । दक्षिणतो भूतभाषाकवयः ... । ’[४] राजशेखराच्या ह्या नोंदीत थोडाफार काल्पनिक भाग आहे असे मानले तरी ह्या नोंदीवरून काव्यपरीक्षासमयी संस्कृत कवींबरोबर प्राकृत, अपभ्रंश व पैशाची भाषांतील कवींनाही निमंत्रण असे, त्यांना संस्कृत कवींच्या आसनास आसन लावून बसण्याचा अधिकार असे आणि प्राकृत कवी व काव्य यांची बूज राजेलोक राखीत असत ह्या गोष्टी सूचित होतात, हे नाकारता येत नाही. सर्वसाधारण जनतेच्या भाषेचा पुरस्कार करण्याचा आणखी एक मार्ग म्हटला म्हणजे राजांनी प्रजेच्या भाषेत शिलालेख खोदवणे हा होय. प्राचीन तसेच मध्ययुगीन राजांनी ह्याही मार्गाचा अवलंब केलेला आढळतो. खिस्तपूर्व पाचव्या शतकातील पिप्रावा येथील शिलालेख तसेच खिस्तपूर्व तिसऱ्या शतकातील सोहगौर येथील ताम्रपट हे दोन्ही प्राकृतात होते, असे. डॉ

१. आधार- हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४२१–४२२.
२. काव्यमी. १६३.
३. हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४२२.
४. काव्यमी. १७५–१७६.

गौरीनाथ शास्त्री[१] ह्यांनी प्रतिपादिले आहे. खिस्तपूर्व काळात संस्कृत भाषा व वाङ्मय ही दोन्ही वैभवाच्या[२] शिखरावर असूनही सम्राट् अशोकाने (इ. स. पूर्व ३ रे शतक ) गिरनार, कालसी, धौली, मनसेहरा, येरगुडी, सोपारा ह्या भिन्नभिन्न ठिकाणी ( अनुक्रमे सौराष्ट्र, उत्तरप्रदेश, ओरिसा, उत्तरप्रदेश-सीमा, आंध्रप्रदेश व महाराष्ट्र ह्या प्रांतामध्ये ) पाली भाषेत ( जी बहुजन समाजाची भाषा होती ) शिलालेख[३] खोदवून घेऊन प्राकृताचाच कैपक्ष घेतला. राजा खारवेलचा हाथीगुंफाचा शिलालेख प्राकृतातच आहे. नासिकचा सिरि पुळुमायीचा शिलालेख म्हणजे मूळ संस्कृत मजकुराचे प्राकृत रूपान्तर होय, असे डॉ. वरदाचारी[४] मानतात. प्रारंभीच्या भारतीय शिलालेखांची भाषा संस्कृत नसून प्राकृत आहे, हे उल्लेखनीय वैशिष्ट्य डॉ. गौरीनाथ शास्त्री[५] आवर्जून सांगतात. इसवी सनाच्या थेट पाचव्या शतकापर्यंतचे शिलालेख प्राकृतात खोदले गेले होते,[६] ही बाब प्राकृताचे महत्त्व व त्यांना असलेले संस्कृतच्या बरोबरीचे मानाचे स्थान ह्यावर प्रकाश टाकणारी आहे. एवंच प्राचीन राजांनी, संस्कृत साहित्य व भाषा यांच्या ऐन सद्दीच्या काळात, प्राकृत, भाषेत शिलालेख खोदवून, स्वतः काव्ये लिहून व पदरी बाळगलेल्या कवींकरवी काव्ये लिहून घेऊन प्राकृताला जो सक्रिय पाठिंबा दिला त्यावरून त्यांच्या मनात संस्कृताइतकीच प्राकृताविषयी आदरभावना होती असे स्पष्टपणे जाणवते.

प्राकृत भाषा व वाङ्मय यांना लाभलेल्या राजाश्रयामध्ये तत्कालीन अनुकूल वाङ्मयीन वातावरणाची भर पडली आणि त्यामुळे प्राकृत भाषातील साहित्य चांगलेच फोफावले. हाल सातवाहनाच्या गाथा-सप्तशतीतील अनेक गाथांवरून तत्कालीन साहित्यिक वातावरणाची कल्पना येते. कवी, त्यांनी रचिलेली काव्ये, गाथा व आख्याने यांचे अनेक उल्लेख गाथांमधून येतात, सुशिक्षित लोक काव्यांचे पठण व मर्मग्रहण करीत असत आणि अशिक्षित स्त्रियांना आख्याने ऐकवीत असत; पंडित व शास्त्री यांचेही उल्लेख आहेत; तसेच कवित्व व पाण्डित्य यांचा संघर्षही काही गाथांमध्ये सूचित झाला आहे; अरसिक, कलावंत व रसिक इत्यादींचे निर्देशही आढळून येतात.[७] वात्स्यायनाच्या कामसूत्रामध्ये नागरकाच्या जीवनाचे, दिनचर्येचे; कलाभिरुचीचे जे वर्णन आढळून येते त्यावरून तत्कालीन सुविद्य व सुसंस्कृत नागरिक साहित्य, संगीत, चित्र, नृत्य, इत्यादी अनेक कलांचे कसे मर्मज्ञ व पुरस्कर्ते होते, ते कळून येते.[८] विक्रमादित्याच्या दरबारी कालिदासादि नवरत्ने होती हे प्रसिद्धच आहे. प्राचीन कालच्या राजांप्रमाणेच मध्ययुगीन राजांनीही, देशी भाषांचा उत्कर्ष झाल्यानंतरच्या काळातही, कलापोषक वातावरणाची साक्षेपाने जोपासना केलेली आढळते. उदाहरणार्थ, बंगालच्या लक्ष्मणसेन ह्या राजाने ( इ. सनाचे बारावे शतक ) आपल्या दरबारी उमापतिधर, धोयी, गोवर्धन व जयदेव ह्या कवींना आश्रय दिला होता. डॉ. कृष्णम्माचारियर[९] यांनी केरळामधील मध्ययुगीन वाङ्मयीन वातावरणासंबंधी पुढील गंमतीदार माहिती पुरविली आहे—पंधराव्या शतकातील मानविक्रम नावाच्या झामोरिनच्या दरबारात १८॥ कवी होते. पैकी १८ कवी संस्कृतामध्ये काव्यलेखन करीत असत. पुन्नट्टु नम्बूद्रि हा कवी ( एकोणिसावा, म्हणजेच साडेअठरावा ! ) जे काव्य लिही त्यात मल्याळम् व संस्कृत यांचे मिश्रण असे. म्हणून त्यास अर्धा कवी म्हणत असत. मात्र त्यास संस्कृत कवींबरोबरीचे[१०] स्थान दिले जात असे, ही बाब महत्त्वाची आहे. साहित्यिक वा कलात्मक वातावरण टिकवून

१. CHCL. 55.
२. SHSL. 63.
३. प्रासाइ ६८१.
४. VHSL. 77.
५. CHCL. 8.
६. Ibid. 9.
७. हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४२७.
८. EL. 19–20.
९. HCSL. 250.
१०. अनेक संस्कृतज्ञ पंडितांनी परिश्रमपूर्वक प्राकृत-काव्य-लेखन केल्याचे पुढे दाखवून देण्यात येणार आहेच.

घरण्यास हिंदू राजांच्या इतकेच साह्य मुसलमानी बादशहांनीही केले होते हे जैनुलाब्दीन बडशाह ( १४२१–१४७२ ) ह्या काश्मीरच्या राजाने जोनराज व श्रीवर ह्या कवि–इतिहासकारांना आश्रय दिला होता[१] ह्या घटनेवरून स्पष्ट होईल. मध्ययुगातच नव्हे तर थेट अठराव्या शतकातही कवी, संगीतकार नर्तक इत्यादी सर्व कलावंत कलासमृद्ध व कलानुरूप वातावरणात कसे वावरत होते ते, खालील श्लोकात त्रावणकोरच्या तिरुनाल रामवर्मन् राजाच्या कारकीर्दीचे जे वर्णन एका कवीने केले आहे, त्यावरून दिसून येईलः–

गहनपदपदार्थज्ञानविज्ञानदक्षैः
अमरगुरुसमानैरर्थशास्त्रप्रवीणैः
सरसगुणकवीन्द्रैर्वाक्प्रसङ्गे विदग्धैः
प्रतिदिनमतिरम्या शोभते राजधानी ॥
श्रुतिमुखरसगीतैर्वेणुवादैर्मनोज्ञैः
चिरपरिचयहस्ताभ्यासतः प्राप्तभावैः ।
मदनरतिसमानैरद्भुताकारपात्रैस्तकतकतक-
शब्दैस्तालमार्गानुकारैः ॥
नटनगतिविलासोल्लासचञ्चत्कटाक्षैः
लयगतिमनुसत्योद्घट्टिताङ्घ्रिप्रचारैः ।
सरसकरविलासैर्हावभावप्रकर्षैः
जयति नृपसमाजो रङ्गलक्ष्मीनिवासः ॥[२]

एकंदरीने, आजूबाजूचे वातावरणही ' रससंपन्न ' असल्यामुळे प्राकृत भाषा लवकरच स्थिरावल्या, वाढल्या व भरभराटल्या. त्या भाषांमध्ये, संस्कृतातल्याप्रमाणेच, अर्थशास्त्र, आयुर्वेद, कामशास्त्र, कोश, गारुडशास्त्र, छंदःशास्त्र, ज्योतिषशास्त्र, द्रव्यपरीक्षाशास्त्र, धातुशास्त्र, निमित्तशास्त्र, पाकशास्त्र, मणिशास्त्र, रत्नपरीक्षाशास्त्र, रिष्टशास्त्र, वनस्पतिशास्त्र, वास्तुशास्त्र, व्याकरणशास्त्र, संगीतशास्त्र इत्यादी शास्त्रीय विषयांवर तसेच उपदेशपर काव्ये, चरित्रग्रंथ, प्रबंध कथा, भक्तिकाव्य, भावकाव्य, महाकाव्ये, संदेशकाव्ये, स्तोत्रकाव्ये, सट्टक ( नाट्य-प्रकार ) इत्यादी वाङ्मयीन प्रकारांवर विपुल व विविध ग्रंथसंपदा निर्माण झाली. प्राकृतांची ही भरभराट संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या डोळ्यादेखत, किंबहुना साक्षीने होत होती, ही बाब विशेषेकरून लक्षात ठेवण्यासारखी आहे.

### प्राकृत अध्ययन-विषय बनला

प्राकृत ह्या सर्वसाधारण समाजाच्या भाषा असल्यामुळे, त्यांना राजाश्रय लाभल्यामुळे, त्यामध्ये विविध, विपुल व सरस वाङ्मय उत्पन्न होऊ लागल्यामुळे व लोकमानसात[३] त्यास दृढ स्थान प्राप्त झाल्यामुळे संस्कृतज्ञांनाही प्राकृतांकडे दुर्लक्ष करणे अशक्य होऊन बसले; नव्हे, संस्कृतज्ञांची भूमिका समंज-

१. कादेसं. १८३–१८४.

२. CKSL. 170–171 / footnote 9.

३. अनेक प्राकृत कवींनी प्राकृताची थोरवी मुक्तकण्ठाने गायिलेली आढळते, ती प्राकृताच्या लोकप्रियतेचीच निदर्शक समजावयास हवी. उदा० राजशेखराने आपल्या कर्पूरमंजिरीत प्राकृतचा गोडवा पुढील शब्दात गायिला आहे–

परुसा सक्कअबंधा पाउअबंधो वि होइ सउमारो ।
पुरिसमहिलाणँ जेत्तिअमिहंतरं तेत्तिअमिमाणं ॥
[ परुषा संस्कृतगुंफाः प्राकृतगुंफोऽपि भवति सुकुमारः ।
पुरुषमहिलानां यावदिहान्तरं तेषु तावत् ॥ ]
– हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४२

प्राकृत गाथांची श्रेष्ठता वर्णितांना जयवल्लभ विचारतो–
ललिअ महुरक्खरए जुवईजणवल्लहे ससिंगारे ।
सते प्राइअकव्वे को सक्कइ सक्कयं पढिउँ ॥

अर्थात् , " ललित व मधुर, शृंगारिक व युवतिजनप्रिय अशा गाथा उपलब्ध असताना संस्कृत काव्ये कोण वाचणार ?

राजशेखराने बालरामायणात (१.१०) प्राकृत ही श्रव्य, दिव्य व प्रकृतिमधुर असते, अपभ्रंश सुश्रव्य असते व पैशाची ( म्हणजे भूतभाषा ) सरसवचन असते असे म्हटले आहे. – प्रासाइ १२ / तळटीप १.

सपणाची, उदारतेची व सहिष्णुतेची असल्यामुळे त्यांनी प्राकृत भाषांचे, कवींचे व त्यांच्या साहित्यकृतींचे मोकळेपणाने व हार्दिक स्वागतच केले. प्राकृत भाषाबद्ध वाङ्मय रसिकांच्या रसग्रहणाचा, काव्यशास्त्रज्ञांच्या परामर्शाचा व सर्वसाधारणांच्या भक्तीचा विषय होऊन बसले. ते पाठशाळांमधून संस्कृत काव्य–महाकाव्यांच्या जोडीने शिकविले जाऊ लागले. थोडक्यात, प्राकृत काव्य व भाषा रसास्वाद, चर्चा–चिकित्सा, समीक्षा ह्यांचा विषय होऊन बसली. एतद्विषयक प्रमाणे अशी —

## हस्तलिखितांची अनेकता

( अ ) प्राकृत कथाग्रंथ, भावकाव्ये, महाकाव्ये इत्यादींची अनेक हस्तलिखिते भारताच्या कानाकोपऱ्यात विखुरलेल्या अनेक ग्रंथ–भाण्डारांत आढळून येतात. उदा० हालाच्या गाथासप्तशतीची हस्तलिखिते काश्मीर-नेपाळपासून तो थेट मलबार–तेलंगणापर्यंत सर्वत्र विपुल प्रमाणात आढळून येतात.[1] प्रवरसेनकृत सेतुबन्ध अर्थात् रावणवह अर्थात् दहमुहवह या महाकाव्याची अनेक हस्तलिखिते देशी व विदेशी ग्रंथालयांमध्ये सापडतात[2]. ह्यावरून, संस्कृत भाषा व साहित्य यांच्या उत्कर्षाच्या काळातही, प्राकृत काव्यांचा वाचकवर्ग फार मोठा होता व तो मोठ्या आवडीने व उत्साहाने ह्या प्राकृत काव्यांचा रसास्वाद घेत होता, असे अनुमान साहजिकपणेच निघते. हस्तलिखितांच्या अनेकत्वाविषयी जो न्याय प्राकृत काव्यांना लागू पडतो तोच प्राचीन मराठी काव्यांनाही.

## प्राकृत काव्याचे अध्ययन

( आ ) डॉ. दशरथ शर्मा ह्यांनी आपल्या 'Sanskrit Authors studied in Rājaputāna in the 12th and 13th centuries" ह्या लेखात[3] कालिदास, बाण, मयूर, श्रीधर, उदयन, हेमचन्द्र, मुरारी, रुद्रट, उद्‌भट, वामन, भामह ह्या संस्कृत कवींबरोबरच वाक्पतिराज ( गउडवहो काव्याचा कर्ता ) ह्या प्राकृत कवीचेही अध्ययन होत असे, हे दाखवून दिले आहे.

१७ व्या शतकामध्ये बंगालातही संस्कृत तसेच प्राकृत वाङ्मयाचा मनःपूर्वक अभ्यास करणारे विद्वान् होते. रामशर्मन् व मार्कण्डेय हे दोघे पूर्वेकडील प्राकृतांचे सतराव्या शतकातील व्याकरणकार आपल्या ग्रंथांमध्ये सेतुबन्ध–प्रभृती अनेक प्राकृत ग्रंथांतील सूक्ती उद्धृत करतात. ह्यावरून त्या काळात बंगाली विद्वान् प्राकृत महाकाव्यांचे अध्ययन करीत असत हे सिद्ध होते, असे डॉ. बसाक[4] म्हणतात. डॉ. गोडे[5] अशी माहिती पुरवितात की, गुजरातेतील पाटणच्या संघवी पाडा भाण्डार या जैन–ग्रंथ–भाण्डारामध्ये प्राकृत व अपभ्रंश ग्रंथांची अनेक हस्तलिखिते आहेत.

---

गउडवहो ह्या प्राकृत काव्याचा कर्ता वाक्पतिराज प्राकृताचे गुणगान करताना म्हणतो– प्राकृतामध्ये नवीन अर्थाचे दर्शन होते. प्राकृत भाषा रचनादृष्ट्या समृद्ध आहे व कोमलतेमुळे मधुर आहे. सगळ्या भाषांचा प्राकृत भाषेत सन्निवेश होतो. सर्व भाषा प्राकृतामधूनच प्रादुर्भूत झाल्या आहेत, जसे समस्त जल समुद्रात प्रविष्ट होते व समुद्रामधूनच उद्‌भूत होते. प्राकृत वाचल्याने विशेष प्रकारचा आनंद होतो. तसेच हृदय बहिर्मुख होऊन विकसित होते; नेत्र मुकुलित होतात. – प्रासाइ. ५९०.

पैशाची ह्या प्राकृत भाषेत लिहिलेल्या 'बृहत्कथा' नामक ग्रंथाच्या कर्त्याला–गुणाढ्याला– व्यासांचा पुनरवतार मानीत असत, त्याच्या ग्रंथाला रामायण-महाभारताच्या तोडीचे समजत असत आणि त्याच्या रसवंतीला नदीप्रवाहाची उपमा देत असत.

दासोपंत, फादर स्टीफन्स, शिवदिनकेसरी इत्यादी मराठी कवींनीही, वरीलप्रमाणेच, मराठी भाषेची थोरवी गायिलेली आढळते.

१. हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ४९.

२. रावणवह– Introduction, IX.

३. RCV. 349–352.

४. रावणवह– Introduction, xi–xii

५. SLH. I. 35 / footnote 1.

**काव्याच्या वर्गीकरणात प्राकृतास स्थान**

( इ ) संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनी काव्याचे छंदोनिष्ठ, विषयनिष्ठ, स्वरूपनिष्ठ व भाषानिष्ठ असे विविध प्रकारांनी वर्गीकरण केलेले आढळते. भरताने नाट्यशास्त्रात नाटकातील पाठ्याचे ( म्हणजे संवादाचे ) पुढीलप्रमाणे वर्गीकरण केलेले आहे—

> द्विविधं हि स्मृतं पाठ्यं संस्कृतं प्राकृतं तथा ।
> तयोर्विभागं वक्ष्यामि यथावदनुपूर्वशः ॥ [१]

भरतानंतरच्या महत्त्वाच्या साहित्यशास्त्रकाराने—भामहाने— शब्द व अर्थ यांच्या ' साहित्याने ' बनलेले काव्य त्रिविध असते असे म्हटले आहे—

> ' शब्दार्थौ साहितौ काव्यं गद्यं पद्यं च तद्द्विधा ।
> संस्कृतं प्राकृतं चान्यद् अपभ्रंश इति त्रिधा ॥ [२]

ह्यावरून भामहाला संस्कृताच्या जोडीनेच प्राकृत तसेच अपभ्रंश ह्या लोकभाषांत निर्माण झालेल्या साहित्याची दखल घेणे इष्ट व आवश्यक वाटले, हेच सिद्ध होते. दण्डीने भामहोक्त तीन प्रभेदांत आणखी एकाची भर घातली हे त्याच्या पुढील उक्तीवरून दिसून येईल :—

> तदेतद् वाङ्मयं भूयः संस्कृतं प्राकृतं तथा ।
> अपभ्रंशं च मिश्रं चेत्याहुरार्याश्चतुर्विधम् ॥
> काद. १।३२.

— दण्डीनंतर होऊन गेलेल्या रुद्रटाने * वरील चार भेदांमध्ये आणखी दोहोंची भर घातलेली आढळून येते. त्याच्या मती गद्यात्मक तसेच छन्दोबद्ध वाक्याचे ( म्हणजेच काव्याचे ) पुढीलप्रमाणे सहा भेद होतात—

> प्राकृतसंस्कृतमागधपिशाचभाषाश्च सूरसेनी च ।
> षष्ठोऽत्र भूरिभेदो देशविशेषादपभ्रंशः ॥१२॥
> रुकालं. १३.

— देशविशेषामुळे अपभ्रंशाचे अनेक भेद होतात, ही रुद्रटाची भूमिका उल्लेखनीय आहे. इसवी सनाच्या बाराव्या शतकात होऊन गेलेल्या वाग्भट नामक काव्यशास्त्रज्ञाने काव्याचे शरीर चार भाषांनी बद्ध असणे संभवते असे म्हटले आहे. [३] त्याची उक्ती अशी:—

> संस्कृतं प्राकृतं तस्यापभ्रंशो भूतभाषितम् ।
> इति भाषाश्चतस्रोऽपि यान्ति काव्यस्य कायताम् ॥१॥

उत्तरकालीन विश्वनाथानेही साहित्यदर्पणामध्ये पद्याचे सर्गबन्ध, आश्वास ( प्राकृतभाषाबद्ध– उदा० सेतुबन्ध), कडवक ( अपभ्रंशभाषाबद्ध– उदा० कर्णपराक्रम ), काव्य ( अनेकभाषाबद्ध, उदा० भिक्षाटन ) असे आणि गद्याचे कथा, आख्यायिका, चम्पू, बिरुद व करम्भक ( वेगवेगळ्या भाषांतील, उदा० प्रशस्तिरत्नावली- १६ भाषाबद्ध ) असे प्रभेद सांगितले आहेत हे प्रसिद्धच आहे. [४] एवंच, संस्कृत काव्यशास्त्रज्ञांनी संस्कृतेतर

१. नाट्यशास्त्र १४–५.

२. भाकालं. १.१६.

* रुद्रटाचा काल इ. स. ८२५–८५० असा मानण्यात आला आहे ( पाहा KSP. 155 ) ह्या काळापावेतो प्राकृत भाषांमध्ये धर्मदासकृत उपदेशमाला हा उपदेशपर कथाग्रंथ, तरंगवइकहा, वसुदेवहिण्डी, समराइच्चकहा, धुत्तक्खाण, कुवलयमाला, इत्यादी काव्यमय शैलीत लिहिलेले, शृंगारपूर्ण प्रेमाख्यानांनी युक्त असे ललित कथाग्रंथ, रमणीय वर्णने, चटकदार आख्यानोपाख्याने, सौष्ठवपूर्ण काव्य इत्यादी विशेषांनी सजलेले विमलसूरिकृत पउमचरिय व हरिवंसचरिय हे चरित्रग्रंथ, ऐतिहासिक प्रबंध, हाल सातवाहनाची गाहासत्तसई हा रसिकजनहृदयदयित असा अमृतमधुर भावकाव्यांचा संग्रह, प्रवरसेनकृत रावणवह, वाक्पतिराजकृत गउडवहो व महुमअविअअ ( मधुमथनविजय ) सर्वसेनरचित हरिविजय, अज्ञातकर्तृक रावणविजय, तसेच कामदत्ता ही सगुण, सालंकृत महाकाव्ये, कालिदासाच्या मेघदूताच्या धर्तीवर लिहिलेले भृंगसंदेश हे संदेशकाव्य, आणि अगणित स्तोत्रे इतके रंजक, ललित वाङ्मय निर्माण झाले होते. त्यामुळे साहजिकपणेच रुद्रटाला संस्कृताव्यतिरिक्त पाच प्राकृत भाषांचा परामर्श घेणे प्राप्त झाले.

३. वाग्भटालंकार. १८.

४. FIP. 152 / footnote 45.



अनुक्रमणिका

प्राकृत भाषांचाही आपल्या विचार-विनिमयात समावेश करून एकूण भारतीय वाङ्मयामध्ये प्राकृत वाङ्मयाला उचित व न्याय्य स्थान मिळवून दिले आणि तसे करताना आपली उदार व व्यापक दृष्टीही प्रदर्शित केली.[१] [ आणि म्हणूनच संस्कृत साहित्यशास्त्राला खऱ्या अर्थाने 'भारतीय साहित्यशास्त्र' म्हणणेच अधिक योग्य आहे. ]

### काव्यशास्त्रीय ग्रंथांमध्ये प्राकृत

( ई ) भारतीय काव्यशास्त्रज्ञ प्राकृत भाषांतील काव्यवाङ्मयाला मान्यता मात्र देऊन थांबले नाहीत. त्यांनी काव्यशास्त्रावरील ग्रंथांमध्ये प्रतिपाद्य विषयाच्या स्पष्टीकरणासाठी प्राकृत ग्रंथांतील अनेक सरस पद्ये उद्धृत करून आपली पुरोगामी वृत्तीच प्रकट केली. आनन्दवर्धनाचा ध्वन्यालोक, धनंजयकृत दशरूपक, भोजरचित शृंगारप्रकाश व सरस्वती-कण्ठाभरण, रुय्यक-विरचित अलंकारसर्वस्व, मम्मटाचा काव्यप्रकाश, हेमचन्द्ररचित काव्यानुशासन, विश्वनाथाचे साहित्यदर्पण आणि जगन्नाथ पण्डितकृत रसगङ्गाधर ह्या काव्यशास्त्रीय ग्रंथांमध्ये एकूण ४९७ प्राकृत पद्ये उदाहृत केलेली आहेत. त्यांचे काव्यशः वर्गीकरण डॉ. जैन[२] यांनी पुढीलप्रमाणे केले आहे:—

| | | |
|---|---|---|
| गाथासप्तशती<br>१४५ गाथा | सेतुबन्ध<br>३६ गाथा | गउडवहो<br>१ |
| शाकुन्तल<br>२ प्राकृत पद्ये | कुवलयाश्वचरित<br>१ | विषमबाणलीला<br>५ |
| बज्जालग्गा<br>१ प्राकृत पद्य | कर्पूरमंजिरी<br>७ | रत्नावली<br>२ |
| मृच्छकटिक<br>१ प्राकृत पद्य | मधुमथनविजय<br>१ | उरलेली<br>अज्ञातकर्तृक |

पुनः, ज्या विषयांच्या विवरणासाठी ही पाकृत पद्ये उद्धृत केली गेली आहेत, त्या विषयांवर संस्कृतामध्ये पद्ये उपलब्ध नव्हती किंवा रचिता येण्यासारखी नव्हती अशातला मुळीच भाग नाही. शास्त्रज्ञांनी उपमादी अलंकार, उदारतादी गुण, अपक्रमादी दोष, उपमाध्वन्यादी ध्वनिभेद, उदात्ता–ऊढा–प्रभृती नायिकाभेद, हर्ष–अनुराग–इत्यादी भाव, मागध्यादी रीती, आणि औचित्यभंग-जलक्रीडा-गूढाभिप्राय–प्रभृती संकीर्ण काव्यतत्त्वे ह्या विषयांच्या स्पष्टीकरणासाठी प्राकृत कवितांची उदाहरणे दिली आहेत. प्रतिपाद्य विचाराच्या विशदीकरणासाठी स्वरचित उदाहरणे देण्याएवढी ज्यांची प्रतिभा समर्थ होती[३] अशा ह्या काव्यशास्त्रज्ञांनी प्राकृताकडे आपला मोर्चा वळविला ही बाब विशेष महत्त्वाची आहे. ती हेच सूचित करते की, काव्यशास्त्रज्ञांची दृष्टी निकोप व साहित्यमूल्यैक होती. साहित्य कोणत्या भाषेत लिहिलेले आहे, ह्या विचाराला त्यांनी कधीच प्राधान्य दिले नाही. भारतात प्रचलित असलेल्या कोणत्याही भाषेतील काव्य असो, ते काव्य-कलादृष्ट्या सरस असल्यास त्याचा स्वीकार व गौरव करावयाचा हीच शुद्ध व स्पृहणीय कलादृष्टी काव्यशास्त्रज्ञांनी बाळगली. त्यांनी प्राकृत साहित्याला कधीही पंक्तिबाह्य मानले नाही. ह्याचाच अर्थ असा की, ज्या आपुलकीने, निष्ठेने व आदराने काव्यशास्त्रज्ञ संस्कृत काव्यांचे अध्ययन करीत असत त्याच आपुलकीने, निष्ठेने व आदराने ते प्राकृत काव्यांचेही अध्ययन करीत असत. एवंच, संस्कृतप्रमाणेच प्राकृत भाषा व काव्य हाही विद्यार्थ्यांच्या अध्ययनाचा, पण्डितांच्या अध्यापनाचा व सर्वसाधारण रसिकांच्या रसग्रहणाचा विषय झाला होता हाच निष्कर्ष निघतो.

### प्राकृत कवितेचे संकेत

( उ ) प्राकृत काव्यांना संस्कृत काव्यासमान दर्जा दिल्यानंतर व ती काव्ये चिंतन-विषय म्हणून स्वीका-

१. ह्या विवेचनावरून प्रो. डी. एस्. शर्मा यांचे पुढील विधान बरोबर नाही, हे आपोआप सिद्ध होईल– " ... For they had only one literature before them to judge, while the English critics had half-a-dozen literatures before them ... ." LCSE. 5. अवतरणारंभीच्या they शब्दाचा संदर्भागत अर्थ ' critics in Ancient India ' असा आहे.

२. प्रासाइ– परिशिष्ट २, ७०३.७८४.

३. ' स्वयं कृतैरेव निदर्शनैरियं
मया प्रक्लृप्ता खलु वागलङ्कृतिः ॥ ' भाकालं. २.९६.

रल्यानंतर शास्त्रज्ञांनी आपल्या नेहमीच्या प्रथेस अनुसरून प्राकृत वाङ्मयाचे विभाजन-वर्गीकरण इत्यादी करून त्याचें संकेत निश्चित केले. उदा. संस्कृतबद्ध काव्याच्या प्रकरणास सर्ग म्हणावे, प्राकृतगण काव्याच्या प्रकरणास स्कंधक संबोधावे, अपभ्रंश भाषेतील काव्य ओसर नामक छंदात रचावे व नाटके मिश्र स्वरूपाची असावीत असा नियम दण्डीने (काद. १–३७) सांगून टाकला. कथा संस्कृत, प्राकृत तसेच अपभ्रंश भाषेतही रचिली जात असे (भाकाल १–२८) दण्डीने कथा सर्व भाषांमध्ये तसेच संस्कृतामध्येही रचावी (काद १–३८) अशी सुधारणा सुचवून प्राकृतांचे महत्त्वही वाढवले आणि कथेचे संचारक्षेत्रही विस्तृत बनवले. प्राकृत कथावाङ्मय संस्कृतातील अनेक युक्त्यांचा अवलंब करू लागले. प्राकृत कथा गुणालंकारानी व ललित पदावलीने नटू लागली, अनेक रमणीय वर्णनांनी सहृदयांच्या हृदयांना मुरळ घालू लागली; सरस प्रेमाख्यानांनी रसिकांना आनंद देऊ लागली. प्राकृत भावकविता संस्कृतातील अमरक-भर्तृहरि-घटकर्पर प्रभृतींच्या भावकवितेप्रमाणे अलंकारांनी नटून-थटून रसिकांपुढे येऊ लागली. प्राकृत कवी संस्कृत कवींप्रमाणेच महाकाव्यादींच्या सुरुवातीस नमस्क्रिया, तदनंतर काव्यप्रयोजन, शेवटी भरतवाक्य, मध्ये नगरे, उपवने, पर्वत, समुद्र इत्यादींची वर्णने देण्याचे काव्यसंकेत पाळू लागले. संस्कृत भाषेतल्याप्रमाणेच छन्दोबद्ध काव्यापासून मुक्तकापर्यंत रचना प्राकृत भाषात होऊ लागली. प्राकृत कविता संस्कृत कवितेस व तिच्या शास्त्रास इतकी शिरोधार्य मानू लागली की, संस्कृतातील काही त्याज्य काव्यप्रवृत्तीही प्राकृतात उतरल्या. उदा० संस्कृतातील भट्टीचे रावणवध किंवा भौमकाचे अर्जुनरावणीय अशी व्याकरण व काव्यशास्त्र यांच्या नियमांच्या स्पष्टीकरणासाठी लिहिलेली काव्ये, किंवा, संध्याकर नन्दीचे रामपालचरित, धनंजयाचे राघवपाण्डवीय, चिदंबराचे राघवपाण्डवीय-यादवीयम् इत्यादी एकाच काव्यात अनेक कथानकांचे कथन करणारी काव्ये प्रसिद्ध आहेत. ह्यांच्या धर्तीवर प्राकृतामध्येही हेमचन्द्राने कुमारवालचरिय, कृष्णलीलाशुकाने सिरिचिंधकव्व (श्रीचिन्हकाव्य), विश्वनाथाने प्रशस्तिरत्नावली, इत्यादी कृत्रिम रचना केल्या. इतकेच काय पण श्रीकण्ठ ह्या केरळीय प्राकृत कवीने संस्कृतातील यमककाव्यांचे (उदा० नीतिवर्मन्कृत कीचकवध, वासुदेवकृत नलोदय व युधिष्ठिरविजय, मानाङ्ककृत वृन्दावनयमक, मदनकृत कृष्णलीला, नारायणकृत सीताहरण इ० ) अनुकरण करून सोरिचरिय नावाचे एक यमककाव्यही लिहून पाहिले. एकंदरीने, प्राकृत काव्य अनेक बऱ्यावाईट संस्कृत संकेतांचे अनुकरण करू लागले, काव्यविषयक अनेक प्रवृत्ती आत्मसात् करू लागले आणि रचनाविषयक अनेक नियमांचा अवलंब करू लागले.* संस्कृत–प्राकृत भाषा व साहित्य यांची मैत्री उत्तरोत्तर दृढ झाली. परिणामी प्राकृत भाषा व साहित्य परस्परांच्या अधिक निकट आली. अर्थात्, संस्कृतप्राकृतांतील हे दळणवळण एकतर्फी होते असे समजण्याचे कारण नाही. किंबहुना, जेव्हा दोन भाषांतील साहित्याचा संपर्क वाढतो तेव्हा त्या दोहोंचे परस्परांवर परिणाम अपरिहार्यपणे होत असतात. संस्कृतप्राकृत साहित्ये ह्या सामान्य नियमाला अपवाद नव्हतीच. त्यामुळेच प्राकृताचाही संस्कृतावर अवश्य परिणाम झाला. उदाहरणार्थ, हालाच्या गाहासत्तसईच्या धर्तीवर प्राचीन अमरकाने अमरुशतक रचिले; जयवल्लभाने वज्जालग्ग हा गाथाकोश सिद्ध केला; गोवर्धन ह्या बाराव्या शतकातील संस्कृत कवीने आर्यासप्तशती लिहिली; बिहारीलालाने ब्रजभाषेत सतसई निर्मिली; सूर्यमल्ल कवीने वीरसतसई नामक काव्याची रचना केली; दयाराम कवीने गुजराती भाषेत सतसया लिहिल्या; आणि दलपतराय नावाच्या गुजराती कवीने दलपतसतसई नावाचे काव्य रचिले.[१] प्रवरसेनाच्या सेतुबन्ध अर्थात् रावणवह ह्या महाकाव्याचा प्रभाव संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषांतील काव्यांवरही पडला. सेतुबंधाच्याच नमुन्यावर बाक्पतिराजाने गउडवहो, रामपाणिवादाने कंसवहो ही प्राकृत महाकाव्ये लिहिली.[२]

* प्राकृत काव्य इतके काव्यशास्त्रमय झाले की, ते आपले स्वतःचे म्हणजे केवळ प्राकृत काव्याच्या परिशीलनावर आधारलेले व त्यामधून उद्भूत झालेले असे काव्यशास्त्र उदयास आणण्यास कायमचे विसरले. समस्त प्राकृत साहित्येतिहासात काव्यशास्त्रावर एकही ग्रंथ आढळत नाही, त्याचे कारण हेच.

१. प्रासाइ– ५७५; हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ५३.

२. रावणवह, Introduction xxi.

भट्टीनेही आपल्या संस्कृतातील महाकाव्याचे नामकरण, प्रवरसेनाच्या पावलावर पाऊल ठेवून, रावणवध असेच केले आहे ह्या वैशिष्ट्याकडे डॉ. बसाक यांनी लक्ष वेधले आहे.[१]

## संस्कृतज्ञांची प्राकृत-रचना

संस्कृत-प्राकृत भाषा व साहित्य यामधील देवाण घेवाण आणखीही अनेक दिशांनी व अंगांनी झालेली आढळून येते. तिचा अमळ बारकाईने पाहणी करून मग ह्या पाहणीपासून लेखारंभी चित्रित केलेल्या सद्यःकालीन भारतातील भाषिक प्रक्षोभावर काही तोडगा सुचविता येतो किंवा कसे याचा विचार करावयाचा आहे. तूर्त संस्कृत पण्डितांनी निराग्रही वृत्तीने प्राकृत भाषा व साहित्य यांची सेवा कशी व किती प्रमाणात केली यासंबंधी माहिती करून घेऊ. संस्कृत पण्डितांनी प्राकृतात ललित तसेच शास्त्रीय अशी उभयविध ग्रंथरचना केलेली आढळते. प्रथमतः ललित ग्रंथांचा परामर्श घेऊ. प्राकृत भाषेत अनेक ऐतिहासिक प्रबंध रचिले गेले आहेत. बप्पभट्टिप्रबंध, मल्लवादिप्रबंध, सिद्धसेनप्रबंध हे मुख्य होत. संस्कृत पण्डित राजशेखर याने चतुर्विंशतिप्रबंध व वस्तुपालप्रबंध नावाचे प्रसिद्ध प्रबंध लिहिले.[२] तर्क, साहित्य व व्याकरण या विषयांत प्रवीण असलेल्या समयसुन्दरगणि नामक संस्कृतज्ञ विद्वानाने ' गाथा साहस्री ' नावाचे सुभाषितरूप गाथांचे संकलन सिद्ध केले.[३] कोउहल नामक एका संस्कृतज्ञ ब्राह्मणाने (ह्याचा कालिदास, सुबन्धु व बाणभट्ट यांच्या साहित्यकृतींशी दाट परिचय होता) लीलावई नावाचे एक महाकाव्य महाराष्ट्री प्राकृतामध्ये रचिले.[४] अनेक शास्त्रात निपुण असलेल्या हेमचन्द्राने कुमारवालचरिय हे द्याश्रय महाकाव्य रचिले.[५] सिरिचिंधकव्व ह्या प्राकृत काव्याचा कर्ता कृष्णलीलाशुक अर्थात् बिल्वमङ्गल अर्थात् कोदण्डमङ्गल हा उत्तम संस्कृतज्ञ होता.[६] साहित्यदर्पण ह्या प्रसिद्ध काव्यशास्त्रीय संस्कृत ग्रंथाचा कर्ता जो विश्वनाथ त्यानेही कुवलयाश्वचरित व प्रशस्तिरत्नावली नावाच्या दोन महाकाव्यांची भर प्राकृत वाङ्मयात घातली आहे; पैकी उपरोक्त काव्यात तर त्याने १६ प्राकृत भाषांचा प्रयोग करून एक विक्रमच करून ठेवला आहे.[७] रामपाणिवाद ह्या अठराव्या शतकातील केरळीय संस्कृत पण्डिताने प्राकृत व्याकरणाचा मुद्दाम अभ्यास करून कंसवहो व उसाणीरुद्ध[८] ही काव्ये प्राकृतात लिहिली. प्राकृत भाषांचा हेतुपुरस्सर अभ्यास करणाऱ्या रामपाणिवादाची प्राकृताविषयीची आपुलकीच दिसून येते. काव्य व संगीत यात निपुण असलेल्या व हरविलास, वैद्यजीवन इत्यादी संस्कृत ग्रंथ लिहिण्याऱ्या लोलिंबराजाने रत्नकलाचरित्र हे मराठी काव्यही रचिले.[९] काव्यमीमांसाकार राजशेखर ह्या प्रख्यात संस्कृत पंडिताने कर्पूरमंजिरी नावाचे सट्टक ( प्राकृत नाटिका ) रचल्याचे प्रसिद्धच आहे. रुद्रदास नावाच्या एका व्याकरणपंडिताने चन्दलेहा नावाचे एक शृंगाररसप्रचुर सट्टक रचिले.[१०] तसेच महाराष्ट्र-चूडामणि व ' सर्वभाषाकवि ' म्हणून प्रख्यात असलेल्या घनश्याम नामक पंडिताने ६४ संस्कृत ग्रंथ, २० प्राकृत ग्रंथ व २० देशीभाषाबद्ध ग्रंथ रचिले. त्याने रचिलेल्या प्राकृत ग्रंथांमध्ये आनन्दसुंदरी नावाच्या सट्टकाचा समावेश होतो.[११] घनश्यामाप्रमाणेच षट्भाषात निपुण असलेल्या नयचन्द्र नामक कवीने रंभामंजरी नावाचे एक सट्टक लिहिले. त्यामध्ये त्याने संस्कृत व मराठी भाषांचाही प्रयोग केला आहे.[१२] मेघविजयगणि नावाच्या सतराव्या शतकातील एका जैन आचार्याने संस्कृत व गुजराती अशा दोन्ही भाषांत काव्ये लिहिली.[१३] त्याच शतकातील रघुनाथ ( १६७५-१७१२ ) नामक एका संस्कृत कवीने भोजनकुतूहल, साहित्यकुतूहल, प्रायश्चित्तकुतूहल, जनार्दनमहोदधि, धर्मामृतमहोदधि व काशीमीमांसा हे संस्कृत ग्रंथ लिहून झाल्यावर नरकवर्णन, पतिव्रताधर्म, गोवर्धनोद्धारण इत्यादी प्राकृत अर्थात् मराठी ग्रंथ, लोकोपकारासाठी लिहिले,[१४]

---

१. तत्रैव. २. प्रासाइ ३५५. ३. तत्रैव ५८४. ४. प्रासाइ. ५९५-५९८.

५. तत्रैव ५९८- ६०३. ६. तत्रैव ६०३-६०५. ७. तत्रैव, ६६५. ८. CKSL 189.

९. SLH. II. 79-80. ह्या लोलिंबराजाने भागवतटीका व पदे मराठीत लिहिल्याचा उल्लेख ( सारस्वत. २७६-२७७ ) आढळतो.

१०. प्रासाइ ६३०-६३१. ११. तत्रैव- ६३२-६३३. १२. तत्रैव. ६३३-६३५.

१३. SLH. I. 91 / footnote. १४. SLH. II. 391-403.

त्याच म्हणजे सतराव्या शतकातल्याच कृष्ण नामक कवीने (१६६९-१७७०) ईश्वरविलास, पद्यमुक्तावलि, वेदान्तपंचविंशति इत्यादी संस्कृत काव्ये हातावेगळी करून मग अलंकारकलानिधि, सांभरयुद्ध, जाजऊ युद्ध, बहादुरविजय, शृंगाररसमाधुरी, विदग्ध-माधवमाधुरी, जयसिंहगुणसरिता, रामचंद्रोदय, रामरासा, वृत्तचन्द्रिका इत्यादी काव्ये, व्रज भाषेत (म्हणजे देशी भाषेत) लिहिली.[1] विद्यानाथ, मल्लिनाथ वगैरे अनेक संस्कृतज्ञ पण्डितांनी कानडी भाषेत (म्हणजे देशी भाषेत) उच्च दर्जाचे ग्रंथलेखन करून त्या भाषेला प्रौढपणा आणून दिला. कानडी भाषेत ग्रंथ-लेखनाचा पहिला मान संस्कृतज्ञ जैनांचाच.[2] ह्या बाबतीत गेल्या शतकात होऊन गेलेल्या पुढील दोन राजांची* साहित्यिक कामगिरी वैशिष्ट्यपूर्ण अतएव उल्लेखनीय मानावी लागेल. स्वाती तिरुनाल रामवर्मन् (१८१३-१८४७) हा केरळीय राजा आणि मध्य प्रदेशातील रेवाचे महाराज विश्वनाथसिंह (१८१३-१८५४) हे ते दोन समकालीन राजे होत. रामवर्मन् हा इंग्रजी, संस्कृत, मल्याळी, तमीळ, तेलुगु, कानडी व हिन्दुस्थानी एवढ्या भाषा जाणत असे.[3] त्याने भक्तिमंजरी, पद्मनाभशतक, स्यानन्दुरपुरवर्णन, अजामिळमोक्ष इत्यादी संस्कृत ग्रंथ लिहिले. त्याशिवाय मल्याळम् (म्हणजेच देशी) भाषेतही ग्रंथ लिहिले. खेरीज मल्याळम्, हिंदुस्थानी, कानडी, तेलुगु व मराठी भाषांमध्ये कीर्तने, पदे, प्रबंध इत्यादी संगीतानुकूल कृतीही सिद्ध केल्या.[4] रेवाच्या महाराजांनी रामगीताटीका, रामचन्द्राह्निक, राममंत्रार्थनिर्णय, वेदान्त-सूत्रभाष्य, सर्वसिद्धान्त, रामचन्द्रचम्पू, संगीतरघुनन्दन इत्यादी विविध विषयांवर संस्कृत भाषेत ग्रंथ रचिले. त्याव्यतिरिक्त परमतत्त्वप्रकाश, रागसागर, उत्तमनीति-चन्द्रिका, ध्रुवाष्टक, पाखण्डखण्डिनी, आदिमंगल, चौतीशी, रामायण, शब्द इत्यादी सुमारे ३५ ग्रंथ हिंदी भाषेत लिहिले.[5] येथवर संस्कृतज्ञांनी केलेल्या प्राकृत काव्यरचनेचा परामर्श घेतला. संस्कृतज्ञांनी प्राकृत भाषांत लिहिलेल्या शास्त्रीय वाङ्मयाची थोडक्यात ओळख करून घेऊ.

वररुचि (प्राकृतप्रकाश), भामह (प्राकृतप्रकाशावरी वृत्ती), चन्द (प्राकृतलक्षण), शेषनाग (प्राकृत व्याकरणसूत्र), लंकेश्वररावण (प्राकृतकामधेनु), हेमचन्द्र (सिद्धहेमशब्दानुशासन), क्रमदीश्वर (संक्षिप्तसार), पुरुषोत्तम (प्राकृतानुशासन), रामशर्मा भट्टाचार्य (प्राकृतकल्पतरु), मार्कण्डेय (प्राकृतसर्वस्व), सिंहराज (प्राकृत रूपावतार), लक्ष्मीधर (षड्भाषा-चन्द्रिका), अप्पय्यदीक्षित (प्राकृतमणिदीपिका) इत्यादी प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन प्राकृत वैयाकरण उत्तम संस्कृत जाणणारे विद्वान होते.+ धनपाल

१. Ibid, 282.

२. विद्यारण्य, ९०.

* ह्या दोन राजांशी तंजावरच्या मराठी घराण्यातील अखेरचा राजा जो शरफोजी (शके १७२०-५५) ह्याची सहज तुलना होऊ शकते. कारण ह्या व्युत्पन्न राजाने संस्कृत, मराठी, इंग्रजी अशा अनेक भाषात ग्रंथ-निर्मिती केली आहे (सारस्वत ९९१).

३. बहुभाषिकत्वाच्या दृष्टीने रामवर्मन् राजाला प्राचीन परंपरेचा वारसदारच मानले पाहिजे. संस्कृत-प्राकृत अशी मिश्रभाषात्मक नाट्यरचना करणारे भास-कालिदास-भवभूत्यादी नाटककार, संस्कृत-प्राकृत-अप-भ्रंशादी अनेक भाषा जाणणारे दण्डी-आनन्दवर्धन-विश्वनाथ-हेमचन्द्रादी शास्त्रकार, आणि संस्कृत-प्राकृत-मिश्र भाषेत रचना करणारे हेमचन्द्रादी महाकवी हे राजा रामवर्म्याचे पूर्वसूरी होत. दामोदर पण्डित, नामदेव, रत्नाकर, रुक्मांगद, दत्तपदांकित, दयालनाथ, मुकुंदसुत, इत्यादी अनेक प्राचीन मराठी कवीही बहुभाषाकोविद होते.

४. Cksl. 180–182.

५. Slh. II. 242–258.

\+ प्राचीनांनी अतिशय स्पृहणीय वृत्ती दर्शविली, ह्यात शंका नाही. प्राकृत, देशी तसेच आधुनिक भारतीय भाषांच्या अभ्यासकास संस्कृतामध्ये उत्तम गती असली पाहिजे. तसेच मराठीसारख्या आधुनिक

( पाइयलच्छीनाममाला ) व हेमचन्द्र ( देसीनाममाला ) ह्या दोघा संस्कृतज्ञांनी प्राकृत कोशांची सिद्धता केली. विरहाङ्क, नन्दिताढय, रत्नशेखरसूरी, जिनप्रभ, स्वयंभू इत्यादी संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश पंडितांनी वृत्तिजातिसमुच्चय, गाहालक्खण, छन्दःकोश, छन्दोलक्षण, स्वयंभूच्छन्द इत्यादी छन्दःशास्त्रपर ग्रंथ लिहून त्या शास्त्राची उभारणी केली. ज्योतिरीश्वर कविशेखराचार्य (१३००–१३२५) ह्या मध्ययुगीन संस्कृत पण्डिताने वर्णरत्नाकर नावाचा एक ग्रंथ मैथिली भाषेत लिहिला असून त्याचे स्वरूप विश्वकोशासारखे आहे.[१] ह्या विवेचनावरून लक्षात येईल की, संस्कृतज्ञ पण्डित प्राकृत भाषा व साहित्य ह्यांकडे उदार दृष्टीनेच पाहात होते. प्राकृत भाषेत ललित तसेच शास्त्रीय स्वरूपाची ग्रंथरचना करण्यात त्यांना कोणताही कमीपणा वाटला नाही. उलट त्यांनी अत्यंत आपुलकीने व निष्ठेनेच प्राकृत भाषा व साहित्य यांची सेवा केली.

## संस्कृत ग्रंथांवर प्राकृत व प्राकृतांवर संस्कृत टीका

संस्कृत पण्डितांना प्राकृतांबद्दल कधीच दुरावा वाटत नसल्यामुळे आणि भिन्न भाषिकांचे परस्परसंबंध अत्यंत सलोख्याचे व जिव्हाळ्याचे असल्यामुळे त्यांनी परस्पर देवाणघेवाणीची अनेक दालने उघडली. त्यांपैकी काहींचा विचार वर केलाच आहे. आणखी एका दालनात येथे प्रवेश करावयाचा आहे. ते दालन म्हणजे संस्कृत-प्राकृत विद्वानांनी एकमेकांच्या भाषात लिहिल्या गेलेल्या ग्रंथांवर लिहिलेल्या टीका ( ' यथासम्भवमर्थस्य टीकनं टीका[२] । ' – अर्थात् शक्य तितके अर्थाचे स्पष्टीकरण करणाऱ्या व्याख्येस किंवा विवरणास टीका म्हणतात ) हे होय. ज्ञानाचे प्रधान माध्यम संस्कृतच असल्यामुळे त्या भाषेत लिहिल्या गेलेल्या अनेक शास्त्रीय तसेच ललित ग्रंथांचे आकलन करून घेऊ इच्छिणाऱ्या जिज्ञासूंना मूळ संस्कृत ग्रंथ अभ्यासण्यावाचून गत्यंतर नव्हते. त्या ग्रंथातील मर्म व रहस्य संस्कृत न जाणणाऱ्या सर्वसाधारणांपर्यंत[३] पोचण्यासाठी म्हणून संस्कृत ग्रंथांवर प्राकृत भाषांत टीका लिहिण्यात येत असत. अर्थात् संस्कृत ग्रंथांवर ज्या प्राकृत टीका लिहिल्या जात असत त्या गरजेमुळे लिहिल्या जात असत. प्राकृत ग्रंथांवरील संस्कृत टीकांच्या बाबतीत ही परिस्थिती नव्हती. संस्कृतज्ञांना प्राकृत भाषा उत्तम प्रकारे समजत असल्यामुळे प्राकृत ग्रंथाच्या अध्ययनाने त्यांचे काम होण्यासारखे होते. प्राकृत ग्रंथाच्या स्वार्थ आकलनासाठी टीका–टिप्पण्यांची त्यांना आवश्यकता नव्हती. तरीदेखील अनेक प्राकृत ग्रंथांवर संस्कृत टीका लिहिलेल्या आढळतात, त्याची पुढील कारणे संभवतात- (अ) संस्कृत माध्यमाच्या द्वारे प्राकृत ग्रंथ समजावून देण्यासाठी म्हणून अशा टीका लिहिल्या गेल्या असाव्यात (आ) प्राकृत भाषा व साहित्य ह्यांना अध्ययन-विषय म्हणून एकदा मान्यता दिल्यानंतर संस्कृत ग्रंथाविषयी जी वागणूक-वर्तणूक (treatment ) ठेवावयाची तीच प्राकृत ग्रंथांविषयी ठेवावयाची ह्या व्रतामुळे संस्कृतज्ञांनी प्राकृत ग्रंथांवर टीका लिहिल्या असाव्यात. (इ.) प्राकृत भाषा व साहित्य यांना मानाचे व प्रतिष्ठेचे स्थान देण्याच्या इच्छेने कदाचित् प्राकृत ग्रंथांवर टीका लिहिल्या गेल्या असाव्यात. कारण काहीही असो परंतु, संस्कृतज्ञांनी प्राकृत ग्रंथांवर संस्कृत टीका लिहून, आपली दिलखुलास वृत्ती

---

भाषेच्या अध्यापक-अभ्यासकांनी संस्कृत व प्राकृत या दोन्ही भाषांचे अध्ययन करण्याची आवश्यकता आहे. आज मात्र दुर्दैवाने संस्कृतची उपेक्षाच होत आहे. इतकेच नव्हे तर मराठीच्या अभ्यासकांवर संस्कृताच्या अध्ययनाचा बोजा कशाला लादावयाचा, असा प्रश्न अधिकारी विद्वानही करू लागले आहेत. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांच्या भाषणातही संस्कृत-विरोधाचा सूर उमटलेला आढळतो !

१. SLH. I. 283 & footnote 1.

२. काव्यमी. २७.

३. शिष्ट अर्थात् सुविद्य वा सुसंस्कृत लोक संस्कृत तसेच देशी ह्या दोन्ही भाषांत निपुण असत. मात्र सर्वसाधारणांना संस्कृत भाषेत बोलता येत नसे, त्या भाषेतील यच्चयावत् खाचाखोचा समजत नसत. मात्र त्यांना संस्कृत भाषेचे कामचलाऊ ज्ञान अवश्य असे. तसे नसते तर त्यांना संस्कृत नाटकांचा रसास्वाद घेता आला नसता. शिवाय, राजसभेत होणाऱ्या महाकाव्यांच्या वाचन-पठणाचे आकलन झाले नसते.

प्रकट करून उत्तरकालीनांसमोर वर्तनाचा एक आदर्श ठेवून दिला आहे. एवढे प्रास्ताविक तात्त्विक विवेचन करून आता संस्कृत-प्राकृत टीकांकडे वळू या.

### संस्कृत-ग्रंथांवर प्राकृत टीका

कालिदासाच्या रघुवंश ह्या महाकाव्याच्या बारा ते अठरा ह्या सर्गांवर जनार्दन ( ११९२-१३८५ ) नामक पण्डिताने भाष्य लिहिले आहे त्यामध्ये मूळ संस्कृत शब्दांपैकी व वाक्यांपैकी काहींचे स्पष्टीकरण गुजराती भाषेत करण्यात आले आहे. ह्याच भाष्यकाराने कालिदासाच्या मेघदूतावरही ह्याच पद्धतीने भाष्य लिहिले आहे.[१] रामानुजकृत 'अष्टादशरहस्यानि' नामक ग्रंथावर भगवद्दास नामक एका पण्डिताने व्रज भाषेत टीका लिहिली आहे. ह्याच भगवद्दासाने वरदनायकसूरिरचित 'ईश्वरतत्त्वनिरूपण' नामक ग्रंथावर व्रज भाषेतच टीका रचिली आहे.[२] शार्ङ्गदेवाच्या 'सङ्गीतरत्नाकर' ( १३ वे शतक ) नामक संगीतशास्त्रीय ग्रंथावर गंगारामाने संगीतसेतु नामक व्याख्या लिहिली असून तीही 'व्रज' भाषेत आहे.[३] गन्धवाद ( काळ इ. स. १००० पूर्वी )[४] नामक प्रसाधनशास्त्रावरील एका संस्कृत ग्रंथावर मराठी भाषेत टीका लिहिण्यात आली आहे.[५] श्रीपति नावाच्या ज्योतिःशास्त्रज्ञाने ( काळ इ. स. १०२८ चा सुमार ) सिद्धान्तशेखर नावाचा ग्रंथ रचून त्यावर स्वतःच मराठी भाषेत टीका लिहिली आहे.[६] विठ्ठल गलंड याने रामराजकृत 'रसरत्नदीप' नावाच्या वैद्यकशास्त्रावरील संस्कृत ग्रंथाचे मराठी रूपान्तर केले[७] मुद्गलभट्टकृत रामार्यांचा हरिराज नामक कवीने मराठी भाषेत अनुवाद केला आहे.[८] नायकनायिका–भेद, शृङ्गार–भेद, सात्त्विक गुण इत्यादी विषयांची चर्चा करणाऱ्या रसमंजरी ह्या भानुदत्तकृत संस्कृत ग्रंथाची विठ्ठल, भैरव, अनन्त पण्डित इत्यादी पाच-सात कवींनी मराठी भाषान्तरे केली असून,[९] ह्याच ग्रंथावर बाळाचार्य पण्डिताने श्लोकबद्ध मराठी टीका लिहिली आहे.[१०] अश्वशास्त्रावरील अश्वायुर्वेद, अश्ववैद्यक, अश्वचिकित्सा, शालिहोत्र, हरिहरचतुरङ्गम् इत्यादी संस्कृत ग्रंथांतील विषयांची चर्चा करणारे 'शालिहोत्र' नामक अनेक गद्य ग्रंथ मराठीत लिहिले गेले. त्यामध्येच विश्वेश्वरकृत अश्वचिकित्सा ह्या मूळ संस्कृत ग्रंथावरील महाराष्ट्र-टीका-ग्रंथाचा अन्तर्भाव होतो.[११] सतराव्या शतकातील शामराज नामक कवीने 'कामशास्त्रटीका' मराठी भाषेत रचिली होती.[१२] शंकराचार्यांच्या 'ज्ञानसंन्यास' ह्या संस्कृत ग्रंथावर राम नावाच्या कवीने मराठी भाषेत टीका लिहिली होती.[१३] श्रीपति व ब्रह्मदेव ह्या दोघा प्रख्यात ज्योतिषशास्त्रज्ञांच्या ग्रंथांची मराठी भाषान्तरे फार प्राचीन काळीच सिद्ध झाली होती.[१४] मुकुन्दराजाचा विवेकसिंधु हा प्रख्यात मराठी ग्रंथ म्हणजे श्रीशंकराचार्यांच्या प्रतिपादनाचे सारात्मक मराठी विवरण होय.[१५] जयदेवाच्या सुप्रसिद्ध गीतगोविन्द ह्या काव्यावर भीष्माचार्य नावाच्या एका प्रकाण्ड पण्डिताने 'महाराष्ट्र-सुबोधिनी' नावाची टीका मराठी भाषेत लिहिली.[१६] महालिंगदास नामक एकनाथकालीन कवीने कौटिलीय अर्थशास्त्रावर एक मराठी टीका, 'संस्कृत न कळे आरजां जना। म्हणौनि मराठी केली रचना।' असे ग्रंथ-प्रयोजन प्रतिपादून, लिहिली आहे.[१७] श्रीशंकराचार्यांच्या 'बृहद्वाक्यवृत्ति' ग्रंथावर रमावल्लभदास नामक कवीने 'वाक्यवृत्ति' नावाची विस्तृत टीका मराठी भाषेत लिहून सिद्ध केली.[१८] यथार्थदीपिकाकार वामन पाण्डितांनी भर्तृहरीची शतकत्रयी आणि जगन्नाथ पण्डिताची गङ्गालहरी या संस्कृत ग्रंथांवर विशेष खुबीने मराठी साज चढविला.[१९] पिंगल, काश्यप, सैतव इत्यादी संस्कृत छंदःशास्त्रज्ञांच्या ग्रंथांवर आधारित छंदोमंजरी नावाची एक अत्यंत उत्कृष्ट अशी 'देशभाषाबद्ध ( मराठीबद्ध ) टीका रामचन्द्र दैवज्ञ याने रचून मराठी भाषेत एका सुंदर ग्रंथाची भर घातली.[२०] हरिदास नामक ग्रंथकाराने योगवासिष्ठावर मराठी भाषेत टीका रचिली असून तिचे

---

१. SLH. I. 309–316. २. SLH. II . 153 / footnote. ३. Ibid. 244. ४. SLH. III. 1–12. ५. Ibid. 297–308. ६. SLH. I. 415. ७. सारस्वत ७४६. ८. तत्रैव ९५७. ९. सारस्वत ३८५. १०. तत्रैव ९९५. ११. तत्रैव ६०६. १२. तत्रैव ४२०. १३. तत्रैव ४००. १४. तत्रैव २३–२४. १५. तत्रैव ३०. १६. तत्रैव १८१ व ७४९. १७. तत्रैव २३९. १८. तत्रैव २७२. १९. तत्रैव ३६७. २०. तत्रैव ६२७–६२९.

प्रयोजन त्याने पुढील शब्दात सांगितले आहे– 'देश-भाषा टीका प्राकृत । केली विस्तारित जनहितार्थ ।'[१] कोण्या एका अज्ञात कवीने दण्डनीतीवरील संस्कृत ग्रंथांमध्ये प्रतिपादिलेली युक्ती 'महाराष्ट्रभाषेने विस्तार-युक्त सांगतो' असा खुलासा करून 'राजनीति' नावाचा एक ग्रंथ लिहिलेला आढळतो. त्यातील भाषा सालंकृत असून विचारप्रदर्शन प्रौढ व ठसकेबाज आहे.[२] ह्याखेरीज वाल्मीकीचे रामायण, व्यासांचे महाभारत, कृष्णाची गीता, व्यासांचे भागवत ह्या संस्कृत ग्रंथांवर प्राचीन मराठी कवींनी शेकडो 'भाषा टीका' लिहून महाराष्ट्र सारस्वताचे वैभव वाढवले. एकंदरीने गुजराती, व्रज व मराठी भाषिकांनी ललित तसेच शास्त्रीय संस्कृत ग्रंथांवर विपुल व विस्तृत टीकाग्रंथ लिहून असंस्कृतज्ञ व सर्वसामान्य जनांना काव्यांची माधुरी चाखण्याची तसेच शास्त्रीय ज्ञान संपादन करण्याची उत्तम सोय उपलब्ध करून दिली.

## प्राकृत ग्रंथांवर संस्कृत टीका

संस्कृत ग्रंथांवर प्राकृत विवरणे जितक्या प्रमाणावर झाली आहेत तितक्याच प्रमाणावर प्राकृत ग्रंथांवर संस्कृतमध्ये विशदीकरणपर, वाङ्मय निर्माण झालेले आढळते. हे विवरण-ग्रंथ केवळ शास्त्रीय ग्रंथांवर झालेले आहेत अशातला भाग नाही, तर काव्यग्रंथां-वरही संस्कृत व्याख्या-ग्रंथ आढळतात; किंबहुना अशांचीच संख्या अधिक आहे. ह्यावरून सरस, सौष्ठवपूर्ण, सुकुमार व सुललित काव्ये लिहिण्याची ऐपत अंगी असलेल्या संस्कृतज्ञांनी प्राकृत काव्याचा वाङ्मयीन वृत्तीने व निरभिनिवेश दृष्टीने कसा रसा-स्वाद घेतला होता, तेच स्पष्ट होते. प्राकृतातील काव्य-ग्रंथांवरील अशा संस्कृत टीकांचा प्रथम विचार करून नंतर शास्त्रीय ग्रंथांकडे वळू. ह्या दृष्टीने विचार करता असे जाणवते की, हालाची गाथासप्तशती हा सर्वाधिक भाग्यशाली ग्रंथ होता. कारण, ह्या प्राकृत काव्यावर जितक्या टीका लिहिल्या गेल्या तितक्या दुसऱ्या कोणत्याही प्राकृत काव्यावर लिहिल्या गेल्या नाहीत. कुलनाथ, गंगाधर, पीतांबर, प्रेमराज, भुवनपाल, साधा-रणदेव, कुलपति, चैतन्य, भट्ट, भट्टराघव, भोजराज, आजड, माधवयज्व वैदिक,[३] पंडित मथुरानाथ, सुब्रह्मण्य ऊर्फ देवव्रत[४] एवढ्या टीकाकारांच्या[५] संस्कृत टीका उप-लब्ध होतात; ह्याखेरीज ह्या टीकाकारांनी उल्लेखिलेले आणखी अनेक टीकाकार ह्या काव्याचा सन्मान करते झाले. जयवल्लभकृत वज्जालग्ग ह्या प्राकृत सुभाषित संग्रहाची रत्नदेवगणि नामक विद्वानाने संस्कृतामध्ये छाया लिहिली आहे.[६] प्रवरसेनकृत रावणवह ह्या प्राकृत महाकाव्यावर कुलनाथ, लोकनाथ, श्रीनिवास, साहसाङ्क, हर्षपाल ह्या व इतर अनेक टीकाकारांनी संकृतमध्ये टीका लिहून ह्या काव्याचा गौरव केलेला आढळतो.[७] संस्कृत टीकाकारांच्या मनात प्रवरसेन ह्या प्राकृत कवीबद्दल किती आदर वसत होता हे कृष्ण नावाच्या एका दाक्षिणात्य टीकाकाराच्या पुढील दोन श्लोकांवरून स्पष्ट होईल–

" विद्वांसो बहवो ह्यस्य व्याख्यानानी प्रचक्रिरे ।
न तैरप्यखिलैरस्य सम्यगर्थः प्रकाशितः ॥
भावः प्रवरसेनस्य गहनो न हि शक्यते ।
प्राज्ञैरपि परिज्ञातुं मन्दैः किमुत मादृशैः ॥[८] ९१॥

१. तत्रैव ५३६. २. तत्रैव ६१३–६१४. ३. SLH. I. 147 / footnote 3.
४. CKSL. 245. ५. हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ३०–३१. ६. प्रासाइ. ५७९–५८०.
७. रावणवह– Introduction xvi.

८. तत्रैव, Introduction xvi–xvii एका प्राकृत कवीची प्रशंसा करण्याची जी एक निर्म-त्सरी व गुणग्राही वृत्ती कृष्ण कवीने येथे प्रकट केली आहे तीच वृत्ती आणखी अनेक संस्कृत कवींनी केलेल्या प्राकृत कवींच्या स्तवनामध्ये प्रतीत होते. उदा. बाणभट्टाने आपल्या हर्षचरिताच्या प्रस्तावनेत सातवाहनाला पुढील शब्दात आदरांजली वाहिली आहे–

अविनाशिनमग्राम्यमकरोत्सातवाहनः ।
विशुद्धजातिभिः कोशं रत्नैरिव सुभाषितैः ॥ १३ ॥ हर्षचरितम्, ७.

वाक्पतिराजाने लिहिलेल्या गउडवहो ह्या प्राकृत काव्याला हरिपाल नामक संस्कृतज्ञाने गौडवधसार नामक संस्कृत टीकेच्याद्वारे भूषविले (प्रासाइ ५८९). तसेच कोण्या एका अज्ञात टीकाकाराने 'लीलावती-कथा-वृत्ति' रचून कोउहलाच्या 'लीलावई' ह्या प्राकृत काव्याला अलंकृत केले. (प्रासाइ ५९८). हेमचन्द्राच्या कुमारवालचरिय ह्या द्व्याश्रय प्राकृत काव्याच्या संस्कृत भागावर एकाने आणि प्राकृत भागावर दुसऱ्याने अशा दोघांनी टीका लिहिल्या आहेत.[1] तसेच, बिल्वमंगलाच्या गोविन्दाभिषेक अथवा सिरिचिंधकव्व ह्या प्राकृत महाकाव्यावर दुर्गाप्रसादयतीने संस्कृत टीकेचा साज चढविला.[2] राजशेखराच्या विद्धशालभंजिकेला वासुदेवन् नम्बूतिरि ऊर्फ साहित्यमल्ल आणि कर्पूरमंजिरीला अनन्तदास हे टीकाकार लाभले. ह्यांच्या टीकांची नावे अनुक्रमे मार्गदर्शिनी व पदार्थदीपिका अशी आहेत.[3] घनश्याम नावाच्या महाराष्ट्रीय ग्रंथकाराच्या आनन्दसुन्दरी नामक सट्टकावर भट्टनाथाने संस्कृत व्याख्या लिहून ह्या अपूर्व सट्टकाचा योग्य गौरव केला.[4] प्राकृतातील शास्त्रीय ग्रंथांचाही संस्कृतज्ञांनी असाच सन्मान केलेला आढळतो. उदा. वररुचिरचित प्राकृतप्रकाश ह्या व्याकरणशास्त्रावरील ग्रंथावर भामह, वसंतराज, सदानंद, नारायणविद्याविनोद, रामपाणिवाद यांनी टीकाग्रंथ लिहिले आहेत.[5] हेमचन्द्राच्या सिद्धहेमशब्दानुशासन ह्या व्याकरणालाही अनेक टीकांचे भाग्य लाभले.[6] अप्पय्यदीक्षितांच्या 'प्राकृतमणिदीपिका'ह्या व्याकरणाला गोपालाचार्यांनी संस्कृत टीकेच्या साह्याने मण्डित केले आहे.[7] मध्ययुगीन मराठी ग्रंथांकडेही संस्कृतज्ञांनी अशाच कृपादृष्टी वळविली होती, असे प्रत्ययास येते. ज्ञानेश्वरांच्या

'रामचरित' ह्या संस्कृत महाकाव्याचा कर्ता जो अभिनन्द त्याने केलेल्या 'हालेनोत्तमपूजया कविवृषा श्रीपालितो लालितः ।' ह्या हालप्रशस्तीचा उल्लेख ह्या लेखात पूर्वी केलाच आहे. राजशेखरानेही ह्या हालाची स्तुती पुढील शब्दात गायिलेली आढळते–

जगत्यां ग्रथिता गाथा सातवाहनभूभुजा ।
व्यधुद्धतेस्तु विस्तारमहो चित्रपरम्परा ॥ – हालगाथा, प्रस्तावना खण्ड, ५२.

– ह्याखेरीज 'उदयसुन्दरी' कथेचा कर्ता सोढ्ल आणि 'आर्यासप्तशती'चा रचयिता गोवर्धनाचार्य ह्यांनीही हालाचे मनःपूर्वक स्तुतिगान केलेले आहे. इतकेच नव्हे तर रुद्रट, मम्मट, वाग्भट, विश्वनाथ ह्या काव्यशास्त्रज्ञांनीही हालगाथांवर स्तुतिसुमने उधळली आहेत. आद्य प्राकृत महाकवी प्रवरसेन ह्याचे यशोगान करताना बाणभट्ट लिहितो–

कीर्तिः प्रवरसेनस्य प्रयाता कुमुदोज्ज्वला ।
सागरस्य परं पारं कपिसेनेव सेतुना ॥ १४ ॥ हर्षचरितम् , ८.

– दण्डीने आपल्या काव्यादर्शात प्रवरसेनाच्या सेतुबन्धाचे 'सुक्तिरत्नांचा सागर' (काद १–३४) अशा भरघोस शब्दात स्तवन केले आहे. गुणाढ्याची बृहत्कथा ही कामवर्धिका असल्याचे बाणभट्टाने कौतुकादराने म्हटले आहे (समुद्दीपितकंदर्पा कृतगौरीप्रसाधना । हरलीलेव नो कस्य विस्मयाय बृहत्कथा ॥ १७ ॥ – हर्षचरितम् , ९). अशा स्थितीत प्राकृत कवींनीही, त्यांना आदर्शवत् वाटणाऱ्या, किंबहुना गुरुस्थानी असणाऱ्या, संस्कृत कवींविषयी आदरोद्गार काढले असल्यास त्यात मुळीच नवल नाही. वाक्पतिराजाने आपल्या 'गउडवहो' महाकाव्यात सुरुवातीच्या देवतास्तुतिपर ६१ पद्यांनंतर भवभूती, भास, ज्वलनमित्र, कांतिदेव, सुबन्धू, हरिचन्द्र, इत्यादी संस्कृत कविवरांची मुक्तकण्ठाने प्रशंसा केलेली आढळतेही.

१. प्रासाइ ५९८–६०३.
२. तत्रैव ६०३–६०५.
३. CKSL. 245.
४. प्रासाइ ६३३.
५. प्रासाइ ६३७–६३८.
६. तत्रैव ६४३.
७. तत्रैव ६४७.

' अमृतानुभव ' ह्या दार्शनिक ग्रंथावर सहजानंदांची सहजानंदी नावाची संस्कृत टीका आहे.[1] मुकुन्दराजांच्या ' विवेकसिंधु ' नामक ग्रंथाचे संस्कृत रूपान्तर गोपाल मुद्गल याने केले;[2] तर कोण्या अज्ञात विद्वानाने सरस्वती गंगाधरांच्या गुरुचरित्राचे संस्कृतमध्ये भाषान्तर केले.[3] ज्ञानदेवांच्या चांगदेवपासष्टीलाही उत्तरकाळात एका संस्कृत समश्लोकीचा संस्कार घडला[4]. मोरोपंतकृत मंत्र-भागवताच्या पूर्वार्धातील काही भाग आणि 'केकावलि' हे सरस भक्तिकाव्य ह्या दोन ग्रंथांवर शके १७०७ च्या सुमारास रचिलेली संस्कृत टीका काव्यसंग्रहकारांना मिळाली होती.[5] प्राचीन मल्याळम्, तेलुगु, कानडी, गुजराती, हिंदी इत्यादी भाषांतील साहित्याचे सूक्ष्मपणे अध्ययन केल्यास त्या त्या भाषांतील ललित तसेच शास्त्रीय विषयांवरील ग्रंथांवर संस्कृत भाषेत भाषान्तर-रूप व विवरणात्मक ग्रंथ झाले होते, असे आढळून येईल, असा विश्वास वाटतो.

येथवर केलेल्या विवेचनामधून हाती आलेले निष्कर्ष, प्रस्तुत लेखात प्रतिपादावयाच्या अन्तिम मुद्याच्या चर्चेच्या सोयीसाठी, संकलित स्वरूपात मांडतोः–

( १ ) प्राकृत व देशी भाषा व साहित्य यांना राजाश्रय अवश्य लाभला होता.

( २ ) प्राकृत व देशी विद्वानांना समाजात संस्कृत विद्वानांच्या इतकेच मानाचे स्थान होते.

( ३ ) प्राकृत आणि देशी भाषा व साहित्य यांची संस्कृत भाषा व साहित्य ह्यांच्याप्रमाणेच सर्वांगांनी अभिवृद्धी झाली.

( ४ ) संस्कृत पण्डितांनी प्राकृत तसेच देशी भाषांमध्ये ललित आणि शास्त्रीय अशी उभयविध ग्रंथरचना केली.

( ५ ) उलट, अनेक संस्कृतज्ञ प्राकृत भाषिकांनीही संस्कृत भाषेची व साहित्याची सेवा केली.

( ६ ) संस्कृत ग्रंथांवर प्राकृत तसेच देशी भाषांमध्ये अनुवादात्मक व व्याख्यारूप ग्रंथ झाले. तद्वत् प्राकृत व देशी साहित्यालाही संस्कृत भाषान्तर-विवरणांचे भाग्य लाभले.

( ७ ) संस्कृत भाषा व साहित्य ही प्राकृतांनी व प्राकृत-देशी भाषा व साहित्य ही संस्कृताने प्रभावित झाली.

( ८ ) प्राकृत ग्रंथकार संस्कृत कवींची प्रशंसा करीत, तर संस्कृत ग्रंथकार प्राकृत कवींविषयी आदर दर्शवीत.

( ९ ) एकंदरीने वेदकाळापासून चालत आलेली संस्कृत, सर्वसाधारण समाजाची प्राकृत आणि तदुत्पन्न देशी ह्या सर्व भाषांमध्ये व ह्या भाषा बोलणाऱ्या समाजांमध्ये पूर्णपणे समजूतदारपणाचे, सलोख्याचे व देवघेवीचे वातावरण नांदत होते.

( १० ) संस्कृतज्ञ शिष्ट समाज अहंगंडाने पछाड-लेला नव्हता, किंवा प्राकृतज्ञ अवशिष्ट समाज न्यून-गंडाने विकलही झाला नव्हता.

## सद्यःकालीन परिस्थितीवर काही उपाय

लेखारंभी चित्रित केलेली सद्यःकालीन भारतातील भाषिक स्थिती ज्वालाग्राही अतएव सर्वनाशक आहे. तिच्या गर्भात देश छिन्नभिन्न करण्याची दुष्ट शक्ती दडलेली आहे. ह्या घातक परिस्थितीवर मात करून देशाचे ऐक्य अभंग राखण्यासाठी काही उपाय यथा-मती सुचवून हा बराच लांबलेला लेख पुरा करतो–

( अ ) सध्या भारतात बोलल्या जाणाऱ्या सर्वच प्रमुख भाषा लोकांच्या व्यवहाराच्या भाषा आहेत. त्यांना घटनेने मान्यता दिलेली असल्यामुळे आपो-आपच शासनाश्रय लाभला आहे. हळूहळू ह्या राज्य-कारभाराच्या भाषा म्हणून मान्यता पावणार आहेत. साहजिकपणेच त्यांचे ऐश्वर्य वाढणार आहे. ते झपा-ट्याने वाढावे ह्यासाठी आपल्या पूर्वजांनी अनुसरलेल्या एका उपक्रमाचा अवलंब करणे हिताचे ठरेल. तो उपक्रम म्हणजे भिन्नभिन्न भारतीय भाषांतील ललित वाङ्मयीन कृतींची वेगवेगळ्या भाषांमध्ये भाषान्तरे करणे हा होय. ललित वाङ्मयाची भाषा ही हृदयाची भाषा

१. सारस्वत ११७.
२. तत्रैव ३० व १००६.
३. तत्रैव १९१.
४. तत्रैव ७१८.
५. तत्रैव ९४८.

असते. ती सहृदयाला चटकन् समजते. त्यामुळेच साहित्यप्रेमी रसिकाला स्वेतर भाषांतील ललित वाङ्मय वाचावयास मिळाले तर एकीकडे त्याचे मनोरंजनही होईल ( साहित्यास्वादामुळे होणारे मनोरंजन मनुष्याची मानसिक संस्कृती उन्नत करीत असल्यामुळे त्याची समाजाच्या विकासासाठी गरज असते ) आणि दुसरीकडे 'अखिल भारतीय मनाच्या' एकरूपतेची जाणीव होऊन त्याच्या मनात स्वेतर भाषिकांबद्दल सौहार्दाची भावना उपजून वाढीस लागेल. त्याशिवाय, वरील उपक्रमामुळे निरनिराळ्या गंडांचे ( complexes ) उन्मूलन होऊन निरनिराळ्या भाषांतील शब्द, वाक्प्रयोग, कल्पना व विचार यांच्या अनिर्बंध, परस्परोपकारक व निरामय आदान–प्रदानास साह्य होईल. ह्यामधूनच स्वतःच्या भाषेव्यतिरिक्त भाषा शिकण्याची इच्छा व्यक्तीच्या मनात उत्पन्न होऊन भाषिक समंजसपणा वाढीस लागेल.

( आ ) पूर्वजांनी टीकारूप ग्रंथांची निर्मिती केली. आजही टीकारूप ग्रंथांची आवश्यकता आहेच, फक्त त्यांचे स्वरूप वेगळे असणे आवश्यक आहे. इंग्रजी भाषेतील टीकाकार व त्यांचे टीका-तत्त्वज्ञान ह्यांच्याशी आज आपला चांगला परिचय झाला आहे. परंतु शेजारच्या प्रांतातील साहित्य-समीक्षकांच्या विचारसरणीची आपल्याला क्वचितच ओळख असते. ही ओळख व्हावी, वाढावी व तिच्या योगाने खास 'देशी' साहित्यशास्त्राचे मन्दिर उभारणे शक्य व्हावे ह्यासाठी परभाषांतील साहित्यविमर्शकांच्या ग्रंथांचा अभ्यास नेटाने व विपुल प्रमाणात व्हावयास हवा. हा अभ्यास भाषांतररूपाने तसेच परभाषिक साहित्यचिंतकाच्या आलोचनात्मक समस्त ग्रंथसंपदेवरील व्यासंगपूर्ण प्रबंधलेखनाने विचारवंतांसमोर ठेवता येईल. ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र जितके महत्त्वाचे आहे तितकेच उदाहरणार्थ, हजारीप्रसाद द्विवेदींचे 'साहित्यका मर्म' मोलाचे आहे, ही वृत्ती दृढमूल झाली तर वरील दिशेने खूप पल्ला गाठता येईल. एकदा ह्या विचाराला चालना मिळाली तर कालांतराने साहित्यशास्त्रविषयक विचाराच्या विकासाचा अखिल भारतीय इतिहास सिद्ध करणे शक्य होईल.

( इ ) वरील शुद्ध वाङ्मयीन उपक्रमांना विद्यापीठीय वळण लाभल्यास दुधात साखर पडल्यासारखे होईल. ह्या दृष्टीने प्रत्येक प्रांतांच्या राजधानीच्या शहरी असलेल्या तसेच केन्द्र-संचालित विद्यापीठांमध्ये भाषिक ऐक्य-संवर्धन-संस्था ( Institute for promotion of linguistic integration ) सुरू करावी. ह्या संस्थेत घटना-मान्य सर्व भाषांच्या पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाची सोय असावी. अशा संस्थांमध्ये कार्य करणाऱ्या अध्यापकांपैकी आर्य गटात पडणाऱ्या भाषांच्या अध्यापकांनी स्वभाषेचे संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश भाषांशी कोणते संबंध आहेत ते, अध्यापनसमयी दाखवून दिल्यास, अभ्यासकांना आपण 'परकीय' भाषा शिकत आहोत अशा जाणिवेची बाधा होणार नाही आणि परभाषा-ग्रहणाचे कार्य सुकर होईल. काही अभ्यासकांच्या मनात निरनिराळ्या भारतीय भाषांच्या तौलनिक अध्ययनाची प्रेरणा बळावेल, हा लाभ वेगळाच. अर्थात्, ह्या दिशेने खुद्द अध्यापकांनाही भरघोस कार्य करता येण्यासारखे आहे. वरीलसारख्या संस्थांतील अध्यापकांना, संस्था ज्या प्रांतांत प्रस्थापित झाल्या असतील त्या प्रांतांत, प्राचीन काळी येऊन गेलेल्या व स्थायिक झालेल्या स्वभाषिक ग्रंथकारांच्या कर्तृत्वाविषयी संशोधनपूर्वक ग्रंथलेखन करून मायभाषेची व तिच्या साहित्याची सेवा करता येईल.

( ई ) उपर्युक्त वाङ्मयीन व विद्यापीठीय प्रयत्नांना राज्यशासनेही हातभार लावू शकतील. प्रत्येक प्रांतात पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणक्रमात तत्प्रांतीय भाषा व साहित्य हा अनिवार्य विषय करावा. असे केल्याने त्या त्या प्रांतात नोकरीधंद्याच्या निमित्ताने तात्पुरत्या येऊन राहिलेल्या तसेच अन्य कारणामुळे स्थायिक झालेल्या सर्व परप्रांतीयांना त्या प्रांतातील भाषा व साहित्य ह्याबद्दल आपुलकी वाटू लागून त्यांच्यापैकी काहींच्या मनात प्रांतीय भाषेत साहित्यसेवा करण्याची इच्छाही अंकुरित होईल. निदान तो प्रांत, त्या प्रांतातील लोक, त्यांची भाषा व त्यांचे साहित्य ह्यांविषयी वाटणारा दुरावा तरी निरस्त होईल ह्यात शंका नाही.

( उ ) आज ना उद्या उच्च विद्यापीठीय शिक्षणाचे माध्यम मातृभाषा झाल्याविना राहाणार नाहीत. आज जेथे इंग्रजी भाषा वावरत आहे तेथे भावी काळात मराठी, गुजराती, हिंदी इत्यादी प्रांतीय भाषा संचार करू लागतील. सर्व कलाविषयक व शास्त्रविषयक ज्ञान प्रांतीय

भाषांमधून प्रसृत केले जाईल. शास्त्रीय विषय शिकविण्यासाठी पारिभाषिक शब्दांची निकड भासू लागेल. ती पुरी करण्यासाठी संस्कृत तसेच प्राकृत भाषांमध्ये गणित, ज्योतिष, रसायन, पदार्थविज्ञान इत्यादी शास्त्रीय विषयांवर प्राचीन व मध्ययुगीन काळात जे ग्रंथ लिहिले गेले त्यामधील पारिभाषिक शब्दांचा कोश वेळीच सिद्ध करणे आवश्यक आहे. प्राचीन शास्त्रांच्या आवाक्याबाहेर असलेल्या अनेक आधुनिक विषयांची परिभाषा स्वतंत्रपणे सिद्ध करावी लागेल हे खरे व त्यासाठी अन्य साधनांचे व मार्गांचे साह्य घ्यावे लागेल हेही तितकेच खरे. परंतु, हे कार्य साधतानाही प्राचीनांच्या उद्योगापासून मार्गदर्शन मिळण्यासारखे आहे. प्राचीन शास्त्रीय ग्रंथांच्या अध्ययनाच्या साह्याने सिद्ध केलेल्या परिभाषेचे स्वरूप 'अखिल भारतीय' असल्यामुळे ती सर्वग्राह्य होण्यास अडचण येणार नाही. शिवाय, निरनिराळ्या प्रांतांमध्ये सध्या होणारी विद्वानांची ये-जा कालांतराने कमी होईल किंवा अजिबात थांबेल अशी जी धास्ती आज वाटत आहे, तिचे अंशतः निकारण होऊन देशाचे ऐक्य अखण्ड राखण्यास थोडीफार मदतच होईल.

## लेखात उपयोजिलेल्या संक्षेपांचा खुलासा

CHCL– A Concise History of Classical Sanskrit Literature : Dr. Gaurinath Sastri : Calcutta, second edition, 1960.

CKSL– The Contribution of Kerala to Sanskrit Literature : Dr. K. kunjunni Raja : Madras, 1958.

EL– Ancient Indian Erotics and Erotic Literature : Dr. S. K. De : Calcutta, First edition, May 1959.

FIP– The Foundations of Indian Poetry and their Historical Development : Dr. J. Nobel; Calcutta, 1925.

HCSL– History of Classical Sanskrit Literature : Dr. M. Krishnamachariar; Madras, 1937.

KHSL– A History of Sanskrit Literature : Dr. A. B. Keith : London, reprinted in 1953.

KSP– History of Sanskrit Poetics : Mm. Dr. P. V. Kane : Delhi; third revised edition, 1961.

LCSE– Literary Criticism in Sanskrit and English : Prof. D. S. Sarma; Madras, 1950.

RCV– Dr. C. Kunhan Raja Presentation Volume; Madras, 1946.

SHSL– A Short History of Sanskrit Literature : Hans Raj Aggarwal : Delhi . second edition, 1963.

SLH. -I. Studies in Indian Literary History, Vol. I : Dr. P. K. Gode : Bombay, 1953.

SLH. II. Studies in Indian Literary History, Vol. II. Dr. P. K. Gode : Bombay, 1954.

SLH. III– Studies in Indian Literary History, Vol. III. Dr. P. K. Gode : Poona, 1956.

VHSL– A History of The Sanskrit Literature : Dr. V. Varadachari ; Allahabad, Second edition, 1960.

काद– महाकविदण्डयाचार्यविरचितः काव्यादर्शः– (व्याख्याकार) आचार्य रामचन्द्र मिश्रः वाराणसी, १९५८.

कादेसं– काश्मीर : देश व संस्कृति ( हिंदी ) : शिवदानसिंह चौहान : दिल्ली, प्रथम संस्करण, १९५०,

काव्यमी– कविराज– राजशेखरविरचिता काव्यमीमांसा– (संपादक) पं. मधुसूदन मिश्र : बनारस, १९३४.

नाट्यशास्त्र– श्रीभरतमुनिविरचित नाट्यशास्त्रम् : (संपादक) केदारनाथ पण्डित : काव्यमाला ४२, मुंबई, द्वितीय संस्करण, १९४३.

**प्रासाइ**– प्राकृत साहित्य का इतिहास (हिंदी) : डॉ. जगदीशचन्द्र जैन : वाराणसी : प्रथम संस्करण, १९६१.

**भाकालं**– आचार्य भामह-विरचित काव्यालङ्कार : (भाष्यकार) देवेन्द्रनाथ शर्मा : पटनाः १९६२.

**रावणवह**– Pravarasena's Rāvaṇa vaha Mahākāvyam : ( Editor ) Dr. Radhagovinda Basak; Calcutta 1959.

**रुकालं**– श्रीरुद्रटप्रणीतः काव्यालंकारः ( संपादक ) मम. पं. दुर्गाप्रसाद व वा. ल. पळशीकर, काव्यमाला २, मुंबई, तृतीयावृत्ति, १९२८

**वाग्भटालंकार**– श्रीवाग्भटप्रणीत वाग्भटालङ्कारः- ( टीकाकार ) डॉ. सत्यव्रत सिंह : वाराणसी, १९५७.

**विद्यारण्य**– स्वामी विद्यारण्य चरित्र आणि कार्य : ग. म. वैद्य : पुणे, पहिली आवृत्ति, १९६५.

**सारस्वत**– महाराष्ट्र-सारस्वत पुरवणीसह– विनायक लक्ष्मण भावे : मुंबई, आवृत्ति पांचवी, इ. स. १९६३.

**हर्षचरितम्** – श्रीबाणभट्टप्रणीतम् हर्षचरितम् : ( संपादक ) सेतुमाधव धीरेंद्राचार्य गजेंद्रगडकर : पुणे.

**हालगाथा**– हालसातवाहनाची गाथासप्तशती : स. आ. जोगळेकर : पुणे, इ. स. १९५६.

---

प्रा. दिगंबर रघुनाथ राणे

# " भारतीय संघराज्यातील राज्यपाल व त्याचे अधिकार "

पश्चिम बंगाल-राज्यातील राजकारणात अलिकडे ज्या नाट्यमय घटना घडल्या, त्यांनी सर्व देशाचे लक्ष वेधून घेतलेले आहे. प. बंगालचे राज्यपाल धर्मवीर यांनी १७ नोव्हेंबर १९६७ रोजी कम्युनिस्ट प्रणीत संयुक्त आघाडीचे मुखर्जी मंत्रीमंडळ अचानक बडतर्फ केले. त्यानंतर सभापती बॅनर्जी यांनी ' जशास तसे ' या न्यायाने डॉ. घोष यांच्या नव्या मंत्रीमंडळास मान्यता न देता विधानसभाच बेमुदत तहकुब करुन टाकली. राजनैतिक गोटातच नव्हे तर सामान्य माणसांच्याही, ही राजकीय उलथापालथ अभूतपूर्व चर्चेचा विषय झालेली आहे. परंतु पश्चिम बंगालमधील हा राजकीय गोंधळ, घटनात्मक पेचप्रसंग आहे, राजनैतिक डावपेच आहेत की आणीबाणीची परिस्थिती तेथे उद्भवली आहे, यासंबंधी जनमानसात अजूनही संभ्रम आहे. काही काँग्रेसविरोधी पक्षांनी, तसेच मोठमोठ्या घटनातज्ञांनी, कायदेपंडितांनी व सामाजिक, राजकीय शैक्षणिक क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींनी राज्यपाल धर्मवीर यांच्या ह्या कृत्याची " लोकशाहीचा खून " " लोकशाहीवर बलात्कार " " लोकशाहीची पायमल्ली, गळचेपी," इ. परखड व कडक शब्दात संभावना करुन त्यांच्यावर घटनाभंगाचा आरोप केला. तर गृहमंत्री यशवंतराव चव्हाण प्रभृतींनी राज्यपाल धर्मवीर यांच्या कृतीचे लोकसभेत व इतरत्र जोरदार समर्थन केले. लोकशाही, समाजवाद, राष्ट्रैक्य व घटनेचे पावित्र्य यांचे संरक्षणच धर्मवीर यांनी केलेले आहे असे त्यांनी ठासून सांगितले. अतिरिक्त पक्षाभिनिवेशाच्या आहारी न जाता लोकशाही व घटना यांचे पावित्र्य व विकास याची चाड असणाऱ्यांनी ह्या सर्व घटनांचा काळजीपूर्वक अभ्यास करणे उपयुक्त ठरेल. संसदीय लोकशाहीचे निकोप व पुरोगामी पायंडे पाडण्याच्या दृष्टीने लोकजागृतीची ही नामी संधी चालून आलेली आहे. " Constitutions are not made, they grow " – घटना बनविल्या जात नाहीत, त्या वृद्धिंगत होतात, " ह्या राज्यशास्त्रातील उक्तीची प्रचीती भारताच्या संसदीय राजकारणात सध्या येत आहे. घटना कितीही चांगली असली परंतु ती राबविणारे चांगले नसले म्हणजे घटनेचा खेळखंडोबा होण्यास वेळ लागत नाही.

लोकशाही म्हणजे राज्यकारभार करण्याचे तंत्र नसून ती एक जीवननिष्ठाही आहे. म्हणूनच लिखित घटनेपेक्षाही अलिखित लोकशाहीसंकेतच लोकशाहीराज्यात प्रभावी ठरतात. ज्या घटनांमुळे प. बंगालमध्ये पेचप्रसंग निर्माण झालेला आहे, त्या प्रासंगिकदृष्ट्या अप्रिय वाटल्या तरी देशाच्या घटनात्मक इतिहासात क्रांतिकारक ठरणार आहेत. त्यांच्या संदर्भात भारतीय संघराज्यात राज्यपालाचे स्थान काय असावे ? हा महत्त्वाचा प्रश्न नव्याने चर्चेस आलेला आहे. एरव्ही थाटामाटात राहणारा, घटकराज्याचे मानचिन्ह असलेला, आपल्याभोवती भीतियुक्त आदराचे वलय धारण करणारा परंतु निरुपद्रवी असलेला राज्यपाल सक्रिय व जागृत झालेला असल्यामुळे घटनेच्या आरशातून त्याचे स्थान व अधिकार तपासणे निकडीचे झालेले आहे.

### वादाचा विषय

भारताच्या नवीन राज्यघटनेत १५३ ते १६२ ही कलमे घटक राज्याच्या राज्यपालासंबंधी आहेत. शिवाय कलम १६३, १७४, १६६, २३९ ( २ ), ९ ( २ ), १८ ( २ ) ३५५ व ३५६ यांच्यातील तरतुदींचाही संबंध राज्यपालपद, त्याचे अधिकार व कार्ये, यांच्याशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या पोहोचतो. राज्यपालपद, त्याची उपयुक्तता, राज्यपालाची नेमणूक, त्याची कार्ये, अधिकार, विधिमंडळ व मंत्रीमंडळाशी संबंध इ. बाबीसंबंधी आतापर्यंत झालेली चर्चा रंगतदार व उद्बोधकही आहे. राज्यपालपदासंबंधी घटनासमितीपासून तर आतापर्यंत बरीच उलटसुलट मते प्रतिपादन

करण्यात येत आहेत. मध्यंतरी तर राज्यपालपद हे ब्रिटिश साम्राज्य–शाहीचा अवशेष आहे म्हणून रद्दच करून टाकावे असा आवाज उठविण्यात आला. काहींच्या मते राज्यपालपद अनावश्यक आहे तर काही तज्ञांच्या मते राज्यपालपद केंद्राच्या हातचे एक बाहुले बनलेले आहे. घटनासमितीत राज्यपालाची निवड कशी व्हावी, तो लोकनियुक्त असावा की राष्ट्रपतींनी नेमलेला असावा ह्या प्रश्नांवर कडाक्याची चर्चा झाली होती. तीत भाग घेताना भारतीय घटनेचे शिल्पकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रभृतींनी आपापले अभिप्राय नमूद करून ठेवलेले आहेत. ते अभिप्राय, घटनेतील प्रत्यक्ष तरतुदी, व आतापर्यंतचा राज्यपालपदाचा अनुभव, यांच्या आधारे राज्यपालपदाच्या स्वरूपाची यथातथ्य कल्पना करणे शक्य आहे.

## राज्यपालांची नेमणूक

घटनेतील हल्लीच्या तरतुदीनुसार राज्यपालाची नेमणूक भारताचे राष्ट्रपती आपल्या सही शिक्क्याच्या हुकुमान्वये करीत असतात. ही नेमणूक ५ वर्षांकरिता असते, परंतु राष्ट्रपतींच्या मर्जीप्रमाणे राज्यपालपदाची मुदत वाढविता येते, राज्यपालाला स्वतःहून राजीनामा देता येतो. येथे एक महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, केंद्रीय संसद ज्याप्रमाणे राष्ट्रपतीस अभियोगाच्या पद्धतीने पदच्युत करू शकते त्याप्रमाणे घटकराज्याच्या विधिमंडळांना राज्यपालास स्थानभ्रष्ट करण्याचा अधिकार नाही. केवळ राष्ट्रपतीच त्याला गैरवर्तनाच्या आरोपाखाली कामावरून दूर करू शकतात. घटनेच्या मूळ मसुद्यात लोकनियुक्त राज्यपालपदाची तरतूद होती. परंतु घटनासमितीने संपूर्ण विचारान्ती राष्ट्रपतीनीच राज्यपालाची नेमणूक करावी, असे नंतर ठरविले. राज्यपालाच्या अधिकारांविषयी सध्या जो वाद उपस्थित झाला आहे, त्याच्या संदर्भात राज्यपालाच्या नियुक्तीबद्दल घटनाकारांचा दृष्टिकोन काय होता, हे समजावून घेणे अत्यावश्यक आहे. लोकनियुक्त (लोकांनी निवडलेल्या ) राज्यपालपदाच्या विरुद्ध जे मुद्दे मांडण्यात आले, त्यांचा गोषवारा खालीलप्रमाणे:–

" राज्यपाल लोकांकडून निवडण्याची तरतूद केली तर राज्यपातळीवरच दोनदा निवडणुका घ्याव्या लागतील. घटक राज्ये ही निवडणुकींच्या राजकारणाचे आखाडे बनतील. राज्यपालपदाचे केवळ नामधारी स्वरूप लक्षात घेता निवडणुकांचा हा जादा खर्च समर्थनीय नाही. घटकराज्याच्या राजकीय नेतृत्वात संघर्ष निर्माण होईल. मुख्यमंत्री व राज्यपाल ह्या दोघात सत्तेची साठेमारी सुरू होईल. राज्यपाल हा सर्व मतदारसंघातून निवडून आलेला असल्यामुळे एकाच मतदार संघातून निवडून आलेल्या मुख्यमंत्र्यावर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करील. परंतु मुख्यमंत्री वास्तव सत्ताधारी असल्यामुळे त्याच्याच सल्ल्याने व पाठिंब्याने राज्यपाल निवडून येईल. परिणामी दुय्यम दर्जाचा मनुष्य उपलब्ध होईल. अशा वेळी राज्यपाल घटकराज्याच्या मुख्यमंत्र्यांच्या हातचे बाहुले बनण्याचा संभव आहे. शिवाय घटकराज्यावर परिणामकारक नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने राष्ट्रपतींनीच राज्यपाल नियुक्त करणे अधिक उपयुक्त होईल." याविरुद्ध लोकनियुक्तीच्या पद्धतीचा पुरस्कार करणाऱ्यांचे समर्थन असे होते की, "राष्ट्रपतींनी नेमलेला राज्यपाल संबंधित घटकराज्याच्या बाहेरील म्हणून त्याला परका वाटेल. त्या राज्याचे विशेष प्रश्न, खास गरजा व खरी सुखदुःखे समजण्यास राज्यपाल असमर्थ ठरेल. म्हणून तो राज्यकारभारात जातीने लक्ष न घालता तटस्थ राहण्याचा प्रयत्न करील. नेमलेला राज्यपाल व मुख्यमंत्री एकाच पक्षाचे नसले तर दोघात विरोध निर्माण होईल. केंद्रस्थानी लोकप्रतिनिधींनी निवडलेला राष्ट्रपती असतो. केंद्राप्रमाणेच घटक राज्याच्या पातळीवरसुद्धा राज्यपाल लोकनियुक्तच असावा. राष्ट्रपतीकडून नेमणूक झालेले राज्यपालपद संघराज्याच्या तत्त्वाशी विसंगत आहे."

भारतीय प्रशासनात संघराज्य, एककेंद्री राज्य, संसदीय राज्य इ. राज्यपद्धतींच्या तत्त्वांची एकत्रित सांगड घालण्यात आलेली आहे. त्यातही राष्ट्रैक्य अबाधित राहण्याच्या दृष्टीने केंद्राला प्रबळ करण्याचा घटनाकारांचा एकूण सूर होता. राज्यपालांची राष्ट्रपतींनी नेमणूक करणे म्हणजे घटकराज्यांची स्वायत्तता मर्यादित करणे होय. राज्यपाल हा केंद्र व घटकराज्ये यांच्यातील महत्त्वाचा दुवा आहे. एका बाजूने तो घटकराज्यातील, राष्ट्रपतींचा प्रतिनिधी (केंद्राचा हस्तक) आहे तर दुसऱ्या बाजूने घटकराज्याच्या कार्यकारी मंडळाचा सर्वोच्च घटनात्मक प्रमुख असा अविभाज्य भाग आहे. राज्यपालपदाच्या ह्या दोन्ही भूमिकात विरोध निर्माण झाला म्हणजे घटनात्मक पेचप्रसंग निर्माण

होतो व त्या राज्यातील राज्यशकटास खीळ बसते. पर्यायाने याचा संबंध केंद्र व घटकराज्ये यांच्या अन्योन्य संबंधांशी येतो. साधारणतः राज्यपालाच्या केंद्राच्या प्रतिनिधित्वाच्या भूमिकेने घटक राज्याच्या घटनात्मक प्रमुखतेच्या भूमिकेवर वरचष्मा प्रस्थापित केलेला दिसतो. राज्यपालांची नेमणूक राष्ट्रपती करीत असले तरी तत्पूर्वी संबंधित राज्याच्या मुख्यमंत्र्यांचा सल्ला घेण्याचा प्रघात पडलेला आहे. हेतु हा की, घटकराज्यावर नको असलेला राज्यपाल लादला जाऊ नये. यासंबंधी संसदेच्या चालू अधिवेशनात बरीच चर्चा झाली. आतापर्यंतच्या अनुभवावरून राज्यपालांची नियुक्ती करताना मुख्य मंत्र्याचा केवळ औपचारिक सल्ला घेतला. म्हणजे केंद्र व घटकराज्य यांच्यात त्याविषयी विश्वसनीय एकमत होतेच असे दिसत नाही. ( उदा० – हरियाना, पश्चिम बंगाल, बिहार, इ. राज्यातील राज्यपालांच्या नेमणुकी ). बदललेल्या राजकीय परिस्थितीच्या संदर्भात राज्यपालपदाच्या नेमणुकीच्या पद्धतीचे संपूर्ण पुनर्विलोकन करणे आवश्यक झालेले आहे. यावर एक प्रभावी उपाय म्हणून राज्यपाल हा संबंधित घटकराज्याच्या मदतीने व संमतीनेच नियुक्त करणे योग्य ठरेल. वाटल्यास संसदेचीही त्यास मान्यता घेण्याचा प्रघात पाडावा. याप्रमाणे राज्यपालाची निवड बहुतांशी, घटकराज्याच्या कबूलीवर अवलंबून राहिली तर घटनेचे कलम ३५५ ते ३५६ यात केंद्राला दिलेले अधिकार व्यवस्थित राबविता येणार नाहीत असा एक आक्षेप घेण्यात येतो, परंतु तो चुकीचा आहे. कारण कलम ३५५ अन्वये प्रत्येक घटकराज्याचे, बाह्य आक्रमण व अंतर्गत अराजकांपासून संरक्षण करण्याची, तसेच त्या राज्याचा राज्यकारभार घटनेतील तरतुदीनुसार चालला आहे की नाही याची खात्री करून घेण्याची, जबाबदारी केंद्रावर टाकण्यात आलेली आहे. कलम ३५६ अन्वये, घटक राज्यात घटनात्मक पेचप्रसंग उद्भवल्यास, राज्याचा राज्यकारभार राष्ट्रपतीनी स्वतःच्या हाती घ्यावा अशी तरतूद करण्यात आली आहे. राज्यपाल व मुख्यमंत्री यांच्यात एकमत असले, व राज्यपालाने ठरलेल्या पद्धतीप्रमाणे राज्यातील घटनात्मक पेचप्रसंगाची (घटनाभंगाची) माहिती राष्ट्रपतीस स्वतःहून पुरविली नाही तरीही कलम ३५६ अनुसार राष्ट्रपतींना स्वतंत्यरीत्या–राज्यपालाच्या अहवालाव्यतिरिक्त–स्वतःच्या अखत्यारीत त्या घटकराज्याचा राज्यकारभाराची सूत्रे आपल्या हाती घेण्याचा अधिकार आहे. त्यामुळे घटकराज्यांचे राज्यपाल संबंधित राज्याच्या मुख्य मंत्र्याच्या सल्ल्याने नेमण्यास आडकाठी येत नाही.

### राज्यपालाचे अधिकार

दुसरा महत्त्वाचा मुद्दा राज्यपालाचे अधिकार, त्यांची व्याप्ती व मर्यादा, त्यांचे मंत्रिमंडळावरील नियंत्रणाचे स्वरूप यासंबंधी उपस्थित झालेला आहे. केंद्रीय स्थानी राष्ट्रपतीला जे कार्यकारी-शासनविषयक अधिकार आहेत त्याप्रमाणे राज्यपातळीवर राज्यपालाच्याही अधिकाराचे स्वरूप आहे. राज्यपाल राज्याचा कार्यकारी प्रमुख असतो. सर्व राज्यकारभार त्याच्या नावे चालविला जातो. त्याच्या, घटनेत नमूद केलेल्या शासनविषयक, कायदेविषयक, अर्थविषयक, न्यायविषयक इ. अधिकाराबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. परंतु घटनेत उल्लेख केलेल्या परंतु संदिग्ध असलेल्या त्याच्या अखत्यारीतील–मर्जीतील खास अधिकारांबद्दल हल्ली बरेच रणकंदन माजलेले आहे. राज्यपालास आपले कोणतेही अधिकार राज्याच्या मुख्य मंत्र्याच्या सल्ल्याने व मदतीनेच वापरता येतात परंतु राज्यपालांच्या ऐच्छिक अधिकाराबद्दल ( Discretionary Powers ) मुख्यमंत्र्यांचा सल्ला घेण्याचे बंधन त्यांच्यावर नाही. कलम १६३ ( १ ) व ( २ ) अन्वये राज्यपाल त्याबद्दल स्वतंत्र आहेत. मात्र केंद्रस्थानी राष्ट्रपतींना पंतप्रधानाच्या सल्ल्याशिवाय वापरता येण्याजोगे राष्ट्रपतींचे अखत्यारीचे ऐच्छिक अधिकार अस्तित्वात नाहीत. हा एकच प्रमुख फरक केंद्रस्थानच्या व घटकराज्याच्या संसदीय राज्यरचनेमध्ये आहे. इतर सर्व बाबतीत घटनेच्या ५ व्या विभागातील राष्ट्रपतिसंबंधी तरतुदी व ६ व्या विभागात दिलेल्या राज्यपालसंबंधी तरतुदी तात्त्विकदृष्टया समान आहेत. त्यामुळे पंतप्रधानप्रमुख असलेल्या केंद्रीय मंत्रिमंडळाशी असलेले राष्ट्रपतीचे घटनात्मक संबंध व मुख्यमंत्री प्रमुख असलेल्या राज्यमंत्री मंडळाशी असलेले राज्यपालाचे घटनात्मक संबंध यांच्यात बरेचसे साम्य दिसते. याला अपवाद घटनेचे कलम २३९, (२) ९ (२) व (१८) (२) हेच काय ते आहेत. आपली राज्यपद्धती ही ब्रिटिश संसदीय राज्यपद्धतीवर बहुतांशी आधारलेली आहे. त्यामुळे

ब्रिटिश राजा-राणीं प्रमाणेच आपल्या राष्ट्रपतींना व राज्यपालांना केवळ नामधारी प्रमुख म्हणून महत्त्व आहे. वास्तवसत्ताधारी लोकनियुक्त मंत्रीमंडळच आहे. भारताचे सर्वोच्च न्यायालय, ( A. I. R. 1655-SC-549- राम जवाया वि. पंजाब राज्य हे प्रकरण ) प्रसिद्ध घटनाशास्त्रज्ञ सी. एफ स्ट्रांग, वाल्टर-बागेदार व एच. आर. जी. ग्रीव्हज् यांनी मंत्रीमंडळाच्या श्रेष्ठत्वाचाच पुरस्कार वेळोवेळी केलेला आहे. " Cabinet is a creature but unlike other creatures, it has power of destroying its creator " - W. Bagehot. " The p. m. weilds the supreme power of dissolution ...... " H. R. G. Greaves - वरील विवेचनावरून हे स्पष्ट होते की, सत्ताधारी पक्ष हा कायदेमंडळात अल्पमतांत आला तर मुख्यमंत्र्यापुढे दोन पर्याय असतात : ( १ ) तो स्वतःहून राज्यप्रमुखांस विरोधी पक्षाच्या बहुमत प्राप्त झालेल्या नेत्यास पाचारण करण्यास, व मंत्रिमंडळ बनविण्यास सांगतो (२) किंवा कलम ८५ (२) ब प्रमाणे कायदेमंडळ बरखास्त करण्यास सांगू शकतो.

## पक्षांतर व राज्यपाल

गेल्या सार्वत्रिक निवडणुकीनंतर भारताच्या राजकीय जीवनात उल्लेखनीय बदल झाले. काँग्रेसला शह देऊन आघाड्यांचे राजकारण काही राज्यात सुरू झाले, त्यातून पक्षांतराची डोकेदुखी निर्माण झाली. पक्षांतरामुळे मध्यप्रदेश, राजस्थान, पंजाब, प. बंगाल व हरियाना इ. राज्यातील मंत्रिमंडळे अस्थिर व दुर्बल झालेली आहेत. त्यापैकी हरियाना व बंगाल या राज्यात तर लोकप्रतिनिधींच्या पक्षांतरामुळे पेचप्रसंग निर्माण झाले. पक्षांतराच्या संधिसाधु व तत्त्वहीन प्रवृत्तीवर एखादा प्रभावी तोडगा शोधून काढणे आवश्यक आहे याची जाणीव सर्व राजकीय पक्षांना झालेली आहे. परंतु दारुड्याला ज्याप्रमाणे अनेक शपथा घेऊनही " बाटलीचा " मोह आवरत नाही त्याप्रमाणे सत्तापिपासेचे प्रलोभन असणाऱ्या राजकीय पक्षप्रतिनिधींना पक्षांतराचा मोह कितपत आवरेल याबद्दल शंकाच आहे. दरम्यानच्या काळात पक्षांतराची समस्या भेडसावीतच राहणार. सत्ताभिलाषेच्या रस्सीखेचीत लोकप्रतिनिधी अनधिकृतपणे पक्षांतर करतात. राज्यपालांना परभारे कळवतात व प्रस्थापित राज्यसत्ता कोलमडून पडते. पक्षोपपक्षांचे विधानसभेतील बलाबल अजमावण्याचा एकच विश्वसनीय लोकशाही मार्ग म्हणजे प्रत्यक्ष विधानसभा भरवून त्यात सत्ताधारी पक्षाला बहुमताचा पाठिंबा आहे की नाही हे पाहाणे. अर्थातच अशावेळी राज्यपाल विधिसभेचे अधिवेशन बोलाविण्याची घाई करतो. व स्वतःच सभेची तारीख ठरवतो ( प. बंगाल– ). राज्यपालास विधिसभेच्या अधिवेशनाची तारीख ठरविण्याचा अधिकार आहे काय? हाही वादाचा प्रश्न आहे. काहींच्या मते घटनेतील कलम १७४ ( १ ), ( २ ) प्रमाणे असा अधिकार राज्यपालास उघड उघड दिलेला आहे. तर काही तज्ञांच्या मते राज्यपाल विधानसभेचे अधिवेशन भरविण्याचा सल्ला व फार तर ताकीद मुख्यमंत्र्याना देऊ शकतो परंतु कोणतीही तारीख निश्चित करू शकत नाही. 'दोन अधिवेशनात ६ महिन्यापेक्षा जास्तीत जास्त अंतर असता कामा नये ' ही घटनेने घालून दिलेली मर्यादा मुख्यमंत्र्याने पाळली म्हणजे झाले. घटनेच्या व्यापक अन्वयार्थानुसार वरील दोन्ही मते एकांगी पडतात. सत्य खालील मुद्यावर आधारलेले असेल, ( १ ) राज्यपालाने विधानसभेची अधिवेशन बोलाविण्याची घाई करावी का करू नये, हे तत्कालीन परिस्थितीवर अवलंबून असेल. साधारण परिस्थितीत मुख्य मंत्र्यांचा सल्ला मानावा लागेल. कारण मंत्र्याच्या सोयीप्रमाणे विधानसभा भरविली तर अधिक उपयुक्त ठरेल. संकटकालीन परिस्थिती अचानक उद्‌भवली व मुख्यमंत्री विधिसभेचे अधिवेशन बोलावण्यास अल्पमताच्या भीतीमुळे टाळाटाळ करू लागला तर त्वरित निर्णय घेणे राज्यपालाचे कर्तव्य आहे. ( २ ) कोणत्याही परिस्थितीत मुख्यमंत्री विधानसभेचे अधिवेशन ६ महिन्याच्यावर लांबणीवर टाकू शकत नाही ( ३ ) पक्षांतराचे वस्तुनिष्ठ सबळ पुरावे उपलब्ध होऊन त्याची खात्री झाल्याशिवाय पक्षांतराच्या अनधिकृत अफवावर भिस्त ठेवून चालणार नाही, राज्यपाल हा निःपक्षपाती असला पाहिजे. अशा वेळी राज्यपालास फारच काळजीपूर्वक नाजूक राजकीय निर्णय घ्यावे लागतील. केवळ तांत्रिक डावपेच खेळून प्रचलित राजसत्तेला पक्षांतराचे

सुरुंग अचानक लावले जात नाहीत ना ? याची दखल राज्यपालाने घेणे अत्यावश्यक आहे. कारण मंत्रिमंडळ कोणत्याही पक्षाचे असले तरी त्याच्या अवनतीच्या दुष्टचक्रास काही अंत राहणार नाही. दिवसागणिक मंत्रिमंडळे गडगडण्याची शक्यता आहे.

### राज्यपालाच्या घटनात्मक स्थानाची उपयुक्तता

राज्यपाल हा केवळ नामधारी प्रमुख असला तरी त्याच्या व्यक्तित्वाच्या जोरावर तो राज्यशकट चालविण्यात अनेक उपयुक्त कार्ये करू शकतो. त्याने 'गुळाचा गणपती' न राहता घटक राज्याच्या राजकीय व सामाजिक जीवनाचे केंद्रस्थान, मानचिन्ह बनावे, आदर्श निर्माण करावा, जनतेशी संपर्क साधून जनइच्छेचा मान ठेवावा अशी त्यापासून घटनाकारांची अपेक्षा होती. नोकरशाहीच्या कृत्रिम, यांत्रिक राज्यकारभारात मानवी अंतःकरणाचा ओलावा निर्माण करण्याच्या दृष्टीने राज्यपालास भरीव स्वरूपाचे कार्य करता येईल. 'तणातणीच्या रटाळ जीवनात माणुसकीची फुंकर घालणारा, प्रसंगी जनतेची पाठ थोपटणारा तर वेळ-पडल्यास तिचे अश्रू पुसणारा, असा कार्यप्रवण परंतु पक्षीय राजकारणापासून अलिप्त' हे घटनाकारांच्या मनी वसत असलेले राज्यपालाचे चित्र आहे. जोपर्यंत अंध, संकुचित पक्षाभिमानाचे दाट सावट भारतीय प्रशासनावर आहे (मग ते कोणत्याही पक्षाचे असो,) घटनाकाराचे हे स्वप्न प्रत्यक्षात उतरणे कठीण आहे. राज्यपाल जी अधिकार ग्रहणाची शपथ न्यायासनासमोर घेतो तीत देवाला साक्ष ठेऊन आपल्या कुवतीनुसार घटनेचे संरक्षण, जपणूक करण्याची ग्वाही देत असतो. म्हणून राज्यघटनेचा स्वतः राज्यपालाकडून कोणत्याही प्रकारे भंग, अवमान, विटंबना, दुर्लक्ष होणे, किंवा त्यास तो कारणीभूत होणे राज्यपालाच्या सुविहित कर्तव्यांशी पूर्णपणे विसंगत आहे. ते एक प्रकारचे राष्ट्रीय पापच ठरेल. राज्यपाल हा राजकारणातील तज्ञ, तटस्थ व पक्षातीत निरीक्षक असावा हा घटनाकारांचा हेतु खालील उताऱ्यात स्पष्ट दिसतो. "On the whole it would be desirable to have people from outside, eminent in some thing, education or other fields of life *who would naturally co-operate fully with* the Government in carrying out the policy of the Government and yet represent before public something above Politics."

---

प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे

# मार्क्सचे मिथ्यावाद

प्राचीन काळी एखाद्या विचारसरणीला मान्यता मिळवायची असली म्हणजे ती ईश्वरप्रणीत धर्मग्रंथांवर आधारलेली आहे वा आत्मानुभूतीतून उद्भवली आहे असा दावा सांगण्यात येत असे. आधुनिक काळी धर्मग्रंथांची व आत्मानुभूतीची प्रतिष्ठा कमी झाली आहे, उलट विज्ञानाच्या आश्चर्यकारक करामतींमुळे वैज्ञानिक प्रतिष्ठा वाढली आहे. त्यामुळे आज एखाद्या विचारसरणीला मान्यता मिळवायची असेल तर ती ईश्वरप्रणीत वा गूढानुभूत आहे असे न सांगता, वैज्ञानिक आहे, शास्त्रीय आहे, असे सांगण्यात येते.

पण शब्द बदलले तरी अर्थ नेहमी बदलतोच असे नाही. शास्त्र या नावाखाली वावरणारी एखादी विचारसरणी पूर्वीच्या धार्मिक व गूढगुंजनी विचारसरणी ज्या मनोवृत्तीतून उद्भवल्या व ज्या कारणास्तव मान्य झाल्या त्याच मनोवृत्तीवर आधारलेली असण्याचा व तसल्याच कारणास्तव पसरली असण्याचा संभव असतो.

याचे ठळक उदाहरण म्हणजे मार्क्सवाद होय. मार्क्सवाद हे एक शास्त्र आहे, तो विज्ञानभूत आहे असे कंठरवाने सांगण्यात येते. वस्तुत: मार्क्सवादी विचारसरणीचे वैज्ञानिक विचारापेक्षा पूर्वीच्या धर्मपंथीय विचारपद्धतीशी अधिक साम्य आहे. प्रस्तुत लेखात या साम्याबद्दल चर्चा करण्याचा मानस आहे.

### श्रममूल्य व अतिरिक्त मूल्य

मार्क्सवादाचे प्रमुख सिद्धान्त असे : (१) वस्तूला असलेले आर्थिक मूल्य ती निर्माण करायला जे श्रम पडतात त्यांच्यामुळेच केवळ निर्माण होते, (२) मजूर त्याला मिळणाऱ्या मजूरीच्या मूल्यापेक्षा अधिक मूल्य निर्माण करतो, (३) हे अधिक मूल्य भांडवलदार घेतो. हेच भांडवलदाराने केलेले मजुराचे शोषण होय.

### विरोधविकासवाद

श्रममूल्य व अतिरिक्त-मूल्य-सिद्धान्त एवढ्यापुरताच मार्क्सवाद मर्यादित असता तर त्याला एका जीवनव्यापी तत्त्वज्ञानाचे वा धर्माचे स्वरूप आले नसते. त्याला असे स्वरूप येण्याचे कारण विरोधविकासवाद हे होय. विरोधविकासवाद हा जडवाद आहे. या वादाप्रमाणे चैतन्यातून जड निर्माण झाले नसून जडातूनच चैतन्य निर्माण झाले आहे. एखाद्या वस्तूच्या केवळ परिमाणात फरक होत गेला म्हणजे एका अवस्थेनंतर या परिमाणभेदातूनच गुणभेद निर्माण होतो. पाण्याचे उष्णतामान वाढते तेव्हा त्या उष्णतामानात केवळ परिमाणाचाच फरक होतो. पण हा फरक शंभर अंशापर्यंत गेला म्हणजे पाण्याची वाफ होते — म्हणजे त्यात नवीन गुण निर्माण होतात. याप्रमाणे जडात काही निव्वळ परिमाणाचे फरक झाले म्हणजे एका अवस्थेनंतर गुणांचा फरक होऊन चैतन्याचा उदय होतो.

मानवी इतिहासाचा विचार करता सामाजिक, राजकीय व बौद्धिक जीवनाचे स्वरूप उत्पादनाच्या साधनांनी नियंत्रित होते असे दिसून येते.[१] उत्पादनाच्या साधनांनी म्हणजे आर्थिक कारणांनी नियमन होणे याचा अर्थ जडाच्या प्रभावाने नियमन होणे.

---

1. The mode of production in material life determines the social, political and intelectual life process in general. 1·3

From the serfs of the middle ages sprang the chartered burghas of the earliest times. From these burghers the first elements of the bourgeoisie were developed. 1·2

या जडवादी नियमनाचे स्वरूप विरोधविकासी आहे. पूर्वी सरंजामशाही नावाची एक अर्थव्यवस्था होती. सरंजामशहांच्याजवळ मोठमोठ्या जमिनी असत. या जमिनीवर काम करायला ते दास बाळगीत. हे दास पुढे मुक्त झाले व लहानसहान धंदे करू लागले. औद्योगिक क्रांतीच्या काळात हे लहान धंदेवाईकच कारखानदार व भांडवलदार झाले. हे भांडवलदार आर्थिक व राजकीय क्षेत्रात प्रबल झाले व त्यांनी सरंजामशहांचा वर्ग संपुष्टात आणला. जो दासवर्ग सरंजामशाहीनेच निर्माण केला होता त्यानेच सरंजामशाहीचा नाश करून भांडवलशाही उदयास आणली. तत्त्वातून विरोधी तत्त्व निर्माण होते व या दोन तत्त्वांच्या संघर्षातून तिसरेच तत्त्व निर्माण होते. अन्वय, विरुद्धान्वय व समन्वय या द्वंद्वात्मक रीतीने इतिहासाचा क्रम चालतो तो असा :

हाच क्रम पुढे चालणार आहे. भांडवलशाहीने मजुरांचा मोठा वर्ग निर्माण केला आहे. भांडवलशाहीची वाढ होत गेली म्हणजे भांडवलशहा व ज्यांच्याजवळ मजुरीशिवाय विकण्यासारखे काही नाही ते मजूर असे दोनच वर्ग उरतील. हा मजुरांचा वर्ग भांडवलशहांच्या विरुद्ध क्रांती करून भांडवलशाही संपुष्टात आणील.

भांडवलशाही संपुष्टात येऊन कामगारांचे राज्य झाले म्हणजे शोषक व शोष्य वर्ग उरणार नाहीत व वर्गकलह बंद होईल. तोपर्यंत मानवाचा इतिहास हा वर्गकलहाचा इतिहास असे समीकरण अबाधित राहील.

## समालोचन

या सिद्धान्तांचा आता क्रमशः विचार करू.

१. आर्थिक मूल्य केवळ श्रमामुळे निर्माण होते याचा अर्थ वस्तूची बाजारामधील किंमत ती निर्मिण्यात जे श्रम खर्च होतात त्यांच्या प्रमाणात असते असा केल्यास हा सिद्धान्त साफ खोटा आहे हे सहज दिसून येते. एखाद्या नटीच्या पायांचा दशलक्ष डॉलरांचा विमा उतरण्यात येतो एवढे त्यांचे आर्थिक मूल्य असते. या मूल्यांचा त्या पायांच्या निर्मितीला किती श्रम पडले याच्याशी काही संबंध नसतो.

या सिद्धान्तातील हास्यास्पदता लपवण्यासाठी मार्क्सवादी आर्थिक मूल्य म्हणजे बाजारातील किंमत नव्हे अशी पळवाट काढतात. पण तरी देखील आर्थिक मूल्य म्हणजे वस्तूची उपभोग्यता, मानवी इच्छा पूर्ण करण्याचे तिचे सामर्थ्य असा अर्थ केल्याशिवाय गत्यंतर नाही. असा अर्थ केला तरी श्रममूल्यसिद्धांताची हास्यास्पदता कायमच उरते. लंगड्या हमालाला धडक्या हमालापेक्षा सामान वाहून नेण्यास अधिक कष्ट करावे लागतात. पण तरी प्रवासी लंगड्या हमालापेक्षा धडका हमालच पसंत करतो. ज्याला संगीताचे अंग नाही त्याला जन्मजात गवयापेक्षा संगीत शिकण्यात व गाण्यात अधिक श्रम करावे लागतात. तरी अशा हठाकृष्ट गवयापेक्षा जन्मजात गवयाच्या गाण्याची उपयोग्यता कमी असत नाही. तेव्हा उपभोग्यतेचा श्रमाशी काहीही संबंध नाही.

केवळ श्रमामुळेच मूल्य निर्माण होते असे मानले तर मूल्यहीन निरर्थक श्रम व मूल्यशाली श्रम असा भेदच नाही असे मानावे लागेल. गाढवाच्या अंगावरील केस मोजत बसणे, घराच्या भिंतींना भोके पाडत बसणे, चित्रपट पाहायला बसलेल्या प्रेक्षकांच्या सायकली टाचण्या टोचून पंक्चर करीत बसणे हे देखील श्रमच आहेत. पण त्यांना कोणीही मूल्यशाली समजत नाही. प्रामाणिक मजुरी करण्याप्रमाणेच चोऱ्या करायला व भीक मागायला देखील कष्ट पडतात. तरी चोरी व भीक यांचे आर्थिक मूल्य शून्य किंबहुना निषेधात्मक असते. तेव्हा मूल्याचा श्रमाशी काही संबंध नाही. मूल्य उपभोग्यतेवर अवलंबून आहे. श्रमामुळे उपभोग्यता निर्माण होत असेल तर श्रम मूल्यशाली ठरतात, नाहीतर नाही.

## युक्तिवाद की वितंडवाद

श्रममूल्यसिद्धान्तापेक्षाही अतिरिक्त मूल्याच्या सिद्धान्ताचे मार्क्सवादात अधिक महत्त्व आहे. या सिद्धान्ताप्रमाणे मिळणाऱ्या मजुरीच्या मूल्यापेक्षा मजूर अधिक मूल्य निर्माण करतो. हे सिद्ध करण्यास मार्क्सने पुढील युक्तिवाद केला आहे.

"मजुराला मिळणारी मजुरी त्याला मजूर म्हणून कार्यक्षम ठेवण्यास आवश्यक असणाऱ्या अन्न, वस्त्र, निवारा वगैरे वस्तूंच्या मूल्याबरोबर असते. या आवश्यक वस्तूइतके मूल्य मजूर अर्ध्या दिवसाच्या श्रमांनी निर्माण करतो.[1] पण भांडवलदार त्याला एवढ्या मूल्याच्याबद्दल पूर्ण दिवस काम करायला लावतो. हे जादा अर्ध्या दिवसाचे काम अतिरिक्त मूल्य निर्माण करते. हे अतिरिक्त मूल्य बळकावून भांडवलदार नफा कमावतो."

वरील वाक्यसमूहाला मी युक्तिवाद म्हटले आहे. वस्तुतः त्याला नुसतेच वाद म्हटले पाहिजे. कारण त्यात युक्तीचा मागमूसही नाही. मजुरी नेहमी अन्न, वस्त्र व निवारा या अत्यावश्यक वस्तूंच्या मूल्याबरोबर असते या विधानाला आधार काय ? अमेरिकेतला मजूर मोटार ठेऊ शकतो, इंग्लंडमधला मजूर नभोवाणी व दूरदृश्य वापरतो. यावरून मजुरी अत्यावश्यक वस्तूंच्या मूल्याइतकीच असते हे विधान नुसते निराधारच नव्हे तर साफ खोटे आहे, हे उघड होते. शिवाय मजुराला अत्यावश्यक असलेल्या वस्तूंचे मूल्य अर्ध्या दिवसाच्या मजुरीनेच निर्माण होते हे गणित मार्क्सने कसे केले ? एक तर कोणतीही वस्तू निर्माण करण्यास साधने व मजुरी या दोहोंचीही आवश्यकता असते. त्यामुळे श्रमामुळे किती मूल्य निर्माण झाले व साधनामुळे किती निर्माण झाले हे सांगणे अशक्य आहे. शिवाय अन्न, वस्त्र, निवारा वगैरे निरनिराळ्या वस्तू निर्माण करण्यास लागणाऱ्या श्रमांचे तौलनिक मूल्य सर्व परिस्थितीत सारखेच असेल असे समजता येत नाही. कापडाच्या गिरणीत अर्ध्या दिवसाइतके श्रम करून आज क्ष मूल्याइतके धान्य निर्माण होत असेल तर उद्या शेती व कापडधंदा यांची परिस्थिती बदलली म्हणजे तेवढ्याच श्रमात २ क्ष किंवा द्वितीयांश क्ष मूल्याचे धान्य देखील निर्माण होऊ शकेल. एकूण मार्क्सने केलेल्या विधानांना काहीच आधार नाही एवढेच नव्हे तर आधार सापडणेही शक्य नाही.

### अर्धजरतीय

मजुरी ही बाजारात विकायला मांडलेल्या इतर वस्तूसारखीच असते, भांडवलदार कापूस, यंत्र वगैरे माल विकत घेतो त्याचप्रमाणे मजुरी देखील विकत घेतो हे मार्क्सला मान्य आहे. असे असून देखील मजुरीला लावलेला न्याय तो इतर विक्रेय वस्तूंना लावायला तयार नाही.[2]

मजूर मजुरी करण्यास कार्यक्षम रहावा यासाठी ज्या वस्तू अत्यावश्यक आहेत त्याच्या मूल्यातच मजुरी खरीदली जाते असे मानले तर कापड निर्मिण्यास जेवढे मूल्य अत्यावश्यक आहे तेवढ्या मूल्यातच कापड खरीदले जाते, व घर निर्मिण्यास जेवढे मूल्य अत्यावश्यक आहे तेवढ्या मूल्यातच घर घेतले जाते असे का म्हणू नये ? असे मानले तर अतिरिक्त मूल्याचा सिद्धान्त आपोआपच खोटा पडतो. कारण मजूर पूर्ण दिवसाच्या मजुरीत ज्या अत्यावश्यक वस्तू खरेदी करतो त्यांचे मूल्य पूर्ण दिवसाच्या मजुरीपेक्षा कमी असणे शक्य नाही.

यावर मार्क्सवाद्यांचे उत्तर असे असते की मजूर नेहमी उपासमारीच्या छायेखाली जगत असल्यामुळे त्याला शक्य तितक्या लवकर मजुरी विकण्याची निकड असते. इतर वस्तु विकणाऱ्यांना तशी निकड नसते, त्यामुळे मजुरीच फक्त न्यूनतम दरात विकली जाते.

मार्क्सवाद्यांना मजुरी म्हणजे गिरण्यासारख्या उद्योगधंद्यातील मजुरीच फक्त विवक्षित असते.

---

1. The daily maintenance of the labour power costs only half a days labour.

2. The doctrine of surplus value is arrived at by supplying Ricardos theory of value to wages, but not to the prices of manufactured articles.

शेतकऱ्यांचा समावेश ते मजुरात करीत नाहीत. पण मजूर उपासमारीच्या छायेत वावरतो तसाच निदान भारतातला शेतकरीदेखील कधी कधी उपासमारीच्या छायेत वावरतो. तेव्हा गिरणी-कामगारांची मजुरी न्यूनतम दरात विकली जाते तसेच शेतकऱ्याने पिकविलेले अन्न न्यूनतम दरात का विकले जाऊ नये ? शेतकऱ्याला जगवण्या-साठी धान्याच्या किमती सावरून धरल्या पाहिजेत अशी ओरड ऐकू येते. यावरून देखील धान्यसुद्धा न्यूनतम दरात विकले जाऊ शकते हे स्पष्ट होत नाही काय ?

केवळ शेतकरीच नव्हे तर पुष्कळ वेळा व्यापाऱ्यांचे देखील भाव घसरल्यामुळे दिवाळे वाजते. यावरून मन्दीच्या दिवसात न्यूनतम दराने माल विकावा लागतो हे तत्त्व मजुरी-प्रमाणेच इतर वस्तूंनाही लागू आहे, हे स्पष्ट होते.

शिवाय मजूर नेहमीच उपासमारीच्या छाये-खाली जगतो व आपली मजुरी विकण्यास उत्सुक असतो या म्हणण्यालाही काही आधार नाही. तेजीच्या दिवसात मजूर मिळणे दुरापास्त होऊन जाते व मजुरीचे दर अनेकपटीने वाढतात. दुसऱ्या वस्तूंच्या बाजाराप्रमाणेच मजुरीच्या बाजारातही तेजी येऊ शकते. येथेही कधी कधी विकणाऱ्याचा वरचष्मा होतो.

## नफ्याची मीमांसा

भांडवलदार अर्ध्या दिवसाची मजुरी देऊन, मजुराकडून पूर्ण दिवसाचे काम घेतो व म्हणून त्याला नफा होतो हे मार्क्सचे म्हणण खरे असेल तर ज्या धंद्यात भांडवलाच्या मानाने मजुरांची संख्या अधिक असते त्या धंद्यात 'अतिरिक्त मूल्य ' व नफ्याचे प्रमाण अधिक असले पाहिजे. अद्ययावत् यंत्रे वापरून हजार मजुरांच्या साहाय्याने जेवढे कापड निर्माण होते तेवढेच मांगठे व चरखे वापरून लाख मजुरांच्या साहाय्याने निर्माण केले तर अधिक 'अतिरिक्त मूल्य' निर्माण झाले पाहिजे, व भांडवलदार अतिरिक्त मूल्याचा हव्यासी असेल तर गिरण्यांच्या ऐवजी चरखे पसंत करण्याचीच त्याची प्रवृत्ती असली पाहिजे. मार्क्सच्या मते भांडवलदारांची अशीच प्रवृत्ती असते. पण प्रत्यक्षात या मताला आधार नाही. कार्यक्षम यंत्रे वापरल्याने अधिक नफा मिळविता येतो व भांडवलदार आधुनिक तंत्रे पसंत करतात असेच दिसून येते.

मूल्य म्हणजे बाजारातील किमत नव्हे असे मार्क्सवादी म्हणत असले तरी मार्क्सच्या युक्ति-वादाची छाननी करता मूल्य व किमत यांची तो सतत गल्लत करीत होता व नफा कसा होतो याची उपपत्ती लावण्यास त्याने अतिरिक्त मूल्याच्या कल्पनेचा उपयोग केला आहे हे स्पष्ट होते. भांडवलदार शंभर रुपये भांडवल गुंतवून १२० रुपये मिळवितो. हे जास्तीचे २० रुपये आले कुठून ? अर्थात् ते त्याने कुणाजवळून तरी लुबाडले असे तर्कशास्त्र अतिरिक्त मूल्याच्या कल्पनेमागे आहे.

वस्तुतः नफा कसा होतो याची प्रक्रिया स्पष्ट आहे. एखादी वस्तू विकून नफा मिळेल की नाही हे तिला किती मागणी आहे यावरून अवलंबून आहे. १०० गज कापड निर्माण करण्यास जेवढा खर्च येतो त्याच्या दुप्पट खर्च २०० गज कापड निर्माण करण्यास येत नाही, त्यापेक्षा कमी येतो व तीनशे गजास तिप्पटीपेक्षा पुष्कळच कमी खर्च पडतो. काही एका सीमेपर्यंत उत्पादनाचे प्रमाण वाढवले की खर्चाचे प्रमाण कमी होत जाते. पण बाजारात मात्र १०० गज कापडा-पेक्षा २०० गज कापडाला दुप्पट किंमत येते. अर्थात् विक्री जितकी जास्त होईल तितका खर्च व प्राप्ती यातील फरक प्राप्तीच्या बाजूने वाढत जातो.

उत्पादनाच्या प्रमाणात उत्पादनखर्च का वाढत नाही हे पुस्तकाचे उदाहरण घेऊन स्पष्ट होईल. पुस्तकाची एक प्रत छापायची असली तरी जुळाऱ्याला सारे पुस्तक जुळवावे लागते ; व हजार छापायच्या असल्या तरी एकच जुळवावे लागते, अर्थात् एका प्रतीचा जुळवणीचा खर्च क्ष असला तर हजार प्रती छापण्यास तो प्रतीमागे

हजारांश होतो. पण बाजारात मात्र पहिल्या प्रतीची जी किंमत असते तीच हजाराव्या प्रतीची असते, कारण ग्राहकाच्या दृष्टीने पहिली प्रत व हजारावी प्रत सारखीच असते.

प्रत्येक वस्तूच्या निर्मितीत उत्पादनाचे प्रमाण वाढल्याने जे वाढत नाहीत असे अनेक घटक असतात. प्राप्तीचे प्रमाण विक्रीच्या प्रमाणाबरोबर वाढते. पण उत्पादनाचा खर्च उत्पादनाच्या प्रमाणाबरोबर वाढत नाही म्हणून नफा होतो. नफ्याची उपपत्ती लावण्यासाठी अतिरिक्त मूल्याच्या निराधार कल्पनेची काही जरूर नाही.

अतिरिक्त मूल्याची कल्पना निराधार आहे असे ठरल्यावर तिच्या आधारे केलेला, भांडवलदार मजुरांचे शोषण करतो हा आरोप आपोआपच गळून पडतो.

## विरोधविकासवादाचा डोलारा

मार्क्सच्या अर्थशास्त्रीय विचारांची याप्रमाणे वासलात लागते. आता त्याच्या विरोधविकास-वादाचा विचार करू.

जडातून चैतन्य निर्माण होते असे मार्क्स ठासून सांगतो. आजचे तत्त्वज्ञ जड व चेतन या शब्दांचे अर्थ निश्चित आहेत असे मानीत नाहीत. 'ॲनॅलिसिस ऑफ माइंड' व 'ॲनॅलिसिस ऑफ मॅटर' या दोन ग्रंथात रसेलने मनाचे जड-स्वरूप व जडाचे चिद्रूप स्पष्टविले आहे व जड व चेतन ही दोन्ही एकाच ना जड ना चेतन अशा तत्त्वावर अधिष्ठित आहेत असा सिद्धान्त मांडला आहे. अर्थात् मार्क्सवादी समजतात याप्रमाणे जडवाद हा निर्विवाद व विज्ञानाधिष्ठित नाही.

काही एका अवस्थेनंतर संख्येच्या वाढीतून गुणभेद निर्माण होतो हा मार्क्सवादी सिद्धान्त देखील फार भोंगळ आहे. शंभर अंश उष्णतामान वाढल्यावर पाण्याचे वाफेत रूपांतर होणे हे गुणपरिवर्तन आहे व पूर्वी हाताला थंड वाटणारे पाणी पन्नास अंशावर गेले की चटके देऊ लागते हे गुणपरिवर्तन नाही असे म्हणण्यात अर्थ नाही. परिमाण वाढल्याने गुणात फरक पडणे ही प्रक्रिया सततच सुरू असते. तिच्यासाठी एखाद्या विशिष्ट प्रमाणात परिमाण वाढण्याची जरूर नाही.

मार्क्सचा जडवाद निर्विवाद सत्य म्हणून स्वीकारता येण्यासारखा नसला तरी तो एक समर्थनीय दृष्टिकोन आहे. पण त्याच्या विरोध-विकासवादाला तेवढेही श्रेय देता येत नाही. निसर्गाचा वा इतिहासाचा क्रम विरोधविकासी आहे याला काहीच प्रमाण नाही. सरंजामशाहीनेच स्वविरोधी भांडवलशाही निर्माण केली हे सिद्ध करण्यास सरंजामशहांचे दासच भांडवलदार झाले असे मार्क्सने विधान केले आहे. वस्तुतः बहुवंश भांडवलदार पूर्वी सरंजामशहांचे दास होते या विधानाला काहीच आधार नाही. भारतात तर गुजराती व मारवाडी वैश्यवर्गातूनच भांडवलदार पुढे आहे हे प्रसिद्ध आहे.

## मार्क्सचे भविष्यपुराण

भांडवलशाहीच्या वाढीबरोबर भांडवलदार व मजूर या दोनच वर्गात समाज विभागला जाईल व मजूर भांडवलशाहीचा नाश करतील ही मार्क्सची भविष्यवाणी आहे. या भविष्यवाणीचा पहिला भाग वस्तुस्थितीच्या अगदी विरुद्ध आहे. निरनिराळ्या प्रकारची यंत्रे व उत्पादनाची तंत्रे निर्माण झाल्यामुळे भांडवलदार कामगारा-व्यतिरिक्त अनेक प्रकारचे तंत्रज्ञ व यंत्रज्ञ यांचे वर्ग निर्माण झाले आहेत. तसेच स्वतःची टॅक्सी व मोटार चालवून पोट भरणारे वहातुकदार स्वतःचे टंकक वापरून टंकनावर स्वतंत्रपणे पोट भरणारे टंकलेखक असे थोडेसे भांडवल गुंतवून स्वतःच्या श्रमावर जगणारे वर्ग पूर्वीच्या दुकानदाराच्या जोडीला निर्माण झाले. या वर्गांना भांडवलदार वा मजूर म्हणता येत नाही.

मार्क्सच्या भविष्यवाणीचा दुसरा भाग म्हणजे कामगार भांडवलशाहीचा नाश करतील. हा अजून तरी कुठेच खरा ठरला नाही. रशियातील क्रांती औद्योगिक कामगारांनी केलेली नव्हती. रशियन क्रांती हे एक शिपायांचे यशस्वी बंड

होते. चीनमधील क्रांतीदेखील औद्योगिक कामगारांनी केलेली नव्हती. कम्युनिस्ट चळवळी करणारे मजूर नसून मध्यमवर्गीच असतात. एकूण मार्क्सने विरोधविकासाची जी तुटपुंजी उदाहरणे दिली आहेत तीही ओढून ताणून आणलेली आहेत.

## पत्त्यांचा बंगला

शिवाय सरंजामशाही, भांडवलशाही वगैरे शब्द मार्क्सने इतक्या ढिलेपणाने वापरले आहेत की त्यांना निश्चित अर्थच नाही. पूर्वी राजे सरदारांना मोठमोठ्या जमिनी बहाल करीत व त्याच्या मोबदल्यात हे सरदार सैन्ये बाळगून युद्धकाळी राजाच्या मदतीस जात. या पद्धतीला सरंजामशाही असे नाव आहे. म्हणजे सरंजामशाही ही एक सैन्य व्यवस्था आहे. पण मार्क्स तिला एक अर्थव्यवस्था समजतो. सरंजामशाहीला अर्थव्यवस्था समजण्यास एखाद्या समाजात जमीन हेच मुख्य उत्पादनाचे साधन होते व बहुअंश जमीन सरंजामदारांच्या मालकीची होती हे दोन मुद्दे सिद्ध व्हावयाला पाहिजेत. पण असे काही सिद्ध करण्याची आपल्यावर जबाबदारी आहे असे मार्क्सला वाटले नाही.

सामाजिक, राजकीय व बौद्धिक जीवनाचे स्वरूप उत्पादनाच्या साधनांनी नियमित होते हे विधान मार्क्सने साधार व सोदाहरण सिद्ध केले नाही. उलट असे आधार शोधू जाता या विधानात काही तथ्य नाही असे दिसून येते. सरंजामशाही समाजात विवाहाची अमुक पद्धती राहील व भांडवलशाही समाजात अमुक राहील असा काहीच नियम नाही. 'सरंजामशाही' भारतात बालविवाह रूढ होते तर "भांडवलशाही" अमेरिकेत त्यांची नव्यानेच टूम पडत आहे. "सरंजामशाही" ग्रीक व अरब समाजात सममैथुन मान्य होते, तर "भांडवलशाही" ब्रिटनमध्ये ते मान्यतेच्या पंथावर आहे. ब्रिटन व जर्मनी हे दोन्ही देश "भांडवलशाहीच" असले तरी एकात लोकशाही व दुसऱ्यात हुकूमशाहीची राजकीय व्यवस्था होती. सरंजामशाही रोममध्ये गुलामगिरीची प्रथा होती तशीच ती आज कम्युनिस्ट देशात देखील आहे. ख्रिस्तोत्तर पहिल्या सहस्रकातल्या "सरंजामशाही" भारतात सर्व विद्याकलांची भरभराट होती उलट दुसऱ्या सहस्रकात "सरंजामशाही" कायम असली तरी बौद्धिक जीवन टाळ कुटण्याच्या उद्योगापुरतेच सीमित झाले होते. तेव्हा कोणत्याही सामाजिक व राजकीय संस्थेचा वा बौद्धिक जीवनाच्या स्वरूपाचा सरंजामशाही भांडवलशाही वगैरे मार्क्सकल्पित अवस्थांशी संबंध आहे असे दाखवून देता येत नाही.

## सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध

सरंजामशाही वगैरे मार्क्सवादी शब्द किती निरर्थक आहेत याचा प्रत्यय १८५७ च्या क्रान्तियुद्धाच्या चर्चेनिमित्त येतो. राणी लक्ष्मीबाई, नानासाहेब पेशवे वगैरे वीर सरंजामशाहीचे प्रतिनिधी होते, ते जिंकले असते तर भारत सरंजामशाहीच्या पकडीखाली जाऊन परागत झाला असता, इंग्रज हे भांडवलशाहीचे प्रतिनिधी होते व जिंकल्यामुळे भारतात भांडवलशाही रुजून तो प्रगतिपथावर आला, म्हणून १८५७ चा संग्राम हा स्वातंत्र्याचा संग्राम नव्हता असे मार्क्सवादी भाष्य आहे.

राणी लक्ष्मीबाई सरंजामशाहीची प्रतिनिधी होती म्हणजे काय? देशावर तिची अधिसत्ता झाली असती तर तिने बिर्लांना कापडाच्या गिरण्या व टाटांना लोखंडाचा कारखाना उघडू दिला नसता असे समजायचे काय? शिवाय ब्रिटिशांची भांडवलशाही आल्यामुळे भारत प्रगतिपथावर आला या म्हणण्यात तथ्य काय? उलट ब्रिटिश राजवटीने भारताचे आर्थिक शोषण केले. ब्रिटिशपूर्व काळात भारत गरीब देश म्हणून ओळखला जात नसे. गरीब व मागासलेला देश ही भारताची कुप्रसिद्धी ब्रिटीश राजवटीतच झाली. आर्थिक क्षेत्रातच नव्हे, तर साक्षरता, तंत्रविद्या वगैरे सर्व बाबतीत ब्रिटिशपूर्व "सरंजामशाही" भारत ब्रिटिश काळातील "भांडवलशाही" भारतापेक्षा समकालीन जगाच्या तुलनेने मागासलेला नव्हता हे सहज दाखवून देता येते.

सरंजामशाही मागसलेली असते या मार्क्सवादी धादान्ताच्या भरीस एतद्देशीय राजांबद्दल ब्रिटिशांनी केलेल्या मतलबी प्रचाराचीही भर पडली आहे. वस्तुतः अठराव्या शतकात एतद्देशीय राजांच्या अंमलाखाली असलेला भारत मागासलेला नव्हता एवढेच नव्हे तर ब्रिटिश काळात देखील ब्रिटिश भारतापेक्षा देशी राजवटीखाली असलेला भारत अधिक प्रगत होता हे दाखवून देणे कठीण जाणार नाही. भारतातील अत्यधिक साक्षरता एका संस्थानात म्हणजे त्रावणकोरमध्ये होती, भारतातील उत्तम धरणयोजना एका संस्थानात म्हणजे म्हैसूरमध्ये होती, व आजही जे शक्य झाले नाही ते देशी माध्यमातून विद्यापीठीय शिक्षण एका संस्थानाने म्हणजे हैद्राबादने प्रत्यक्षात आणले होते. 'सरंजामशाही'वरचे हे मार्क्सवादी आरोप किती निर्मूल आहेत हे यावरून स्पष्ट होते.

## द्वेषाचे तत्त्वज्ञान

बर्टरॅण्ड रसेलने मार्क्सवादाची मूल प्रेरणा द्वेष ही आहे असे म्हटले आहे. द्वेषाने अंध झालेला माणूस द्वेषभावनेला पोषक अशा कल्पनांचे इमले उभारतो. या कल्पनांना प्रत्यक्षाचा आधार कितपत आहे हे जोखून पाहण्याची त्याची इच्छाच नसते. श्रीमंतांचा द्वेष ही विचारांची जन्मदात्री ठरल्यावर श्रीमंत व गरीब यांचा संघर्ष हेच जीवनाचे स्वरूप आहे, श्रीमंताची श्रीमंती गरीबांना लुबाडून साध्य केलेली आहे वगैरे विचार संशयातीत वाटू लागतात.

द्वेषावर आधारलेल्या तत्त्वज्ञानाचे मार्क्सवादाच्या तोडीचेच उदाहरण हिटलरवादाचे आहे. श्रीमंतांचा द्वेष हे मार्क्सच्या विचारांचे अधिष्ठान तसेच ज्यूंचा द्वेष हे हिटलरच्या विचारांचे अधिष्ठान. मार्क्सने श्रीमंत व गरीब यांचा संघर्ष हेच इतिहासाचे सार काढले तर सारा मानवी इतिहास आर्य व ज्यू यांच्या संघर्षाने भरलेला आहे असा हिटलरला दृष्टान्त झाला.

द्वेषभावनेला बुद्धिवादाची पुटे चढवणे हेच मार्क्स व हिटलर या दोघांच्याही विचारांचे स्वरूप आहे.

असे असून मार्क्सचेच विचार जगभर पसरले व हिटलरचे पसरू शकले नाहीत याचे कारण श्रीमंतांचा द्वेष ही भावना सार्वत्रिक आहे. उलट ज्यूंचा द्वेष ही भावना काही देशापुरतीच मर्यादित आहे, हे होय. बाकी शास्त्रीय विचारांच्या इतिहासात मार्क्सचे स्थान हिटलरपेक्षा फारसे वरचे आहे असे मला वाटत नाही.

### आधार


(१) कार्ल मार्क्स :

( 1 ) Capital

( 2 ) Communist Manifesto

( 3 ) Selceted Works,
Editor : V. Adoratsky

(२). बर्टरॅण्ड रसेल :

( 1 ) Portraits from Memory


---

# साहित्याचा धर्म

ले. डॉ. नगेन्द्र, अनु. प्रा. प्यारेलाल गोहेल

भारतात साहित्य आणि धर्म यांचा अभिन्न संबंध राहिला आहे की आधुनिक साहित्य-सृजनकारास व समीक्षकास या दोघांना परस्परापासून अलग सिद्ध करण्यासाठी वरेच परिश्रम करावे लागले. पाश्चात्य समीक्षकांनी भारतीय साहित्याला असे म्हणून कमी लेखण्याचा प्रयत्न केला आहे की, ते ऐहिक जीवनावर आधारित शुद्ध साहित्य नसून प्रामुख्याने धर्माचे एक अंग वनले आहे, म्हणून भारतीय बौद्धिक चैतन्याला साहित्याच्या धर्मनिरपेक्ष अस्तित्वाची प्रस्थापना करण्याची आवश्यकता भासली. परिवर्तनशील काळातील मूल्यात अशी अस्थिरता आली की साहित्य आणि धर्मात एक प्रकारचा विरोधाभास जाणवू लागला. अजूनदेखील ही भावना गेलेली नाही. कारण साहित्य आणि धर्म या दोघांचे अर्थ अत्यंत अनिश्चित आहेत. आजदेखील शब्दातील लवचिकपणामुळे गैरसमज निर्माण होऊ शकतो म्हणून साहित्य आणि धर्म शब्दांच्या अर्थाची निश्चिती होणे आज आवश्यक आहे.

## साहित्य :

वरील संदर्भात भारतीय काव्यशास्त्रात दोन शब्दांचा उल्लेख आढळतो (१) : वाङ्मय आणि (२) साहित्य. पारिभाषिक दृष्टीने वाङ्मयाचा अर्थ अधिक व्यापक आहे. त्याच्या कक्षेत वाणीचा संपूर्ण आलेख येतो. वाङ्मयाचे देखील दोन प्रमुख भेद आहेत – इह वाङ्मयमुभयथा शास्त्रं काव्यं च. (राजशेखर) आधुनिक शब्दावलीत शास्त्र म्हणजे ज्ञानाचे साहित्य आणि काव्य म्हणजे रस-साहित्य. आजच्या विवेचनात साहित्याचा अर्थ आहे:– रस-साहित्य. (मुख्यत्वे करून संस्कृतात 'साहित्य' शब्दाचा उपयोग 'रस' साहित्य. या अर्थाने प्रयुक्त झाला आहे.) इंग्रजी शब्द 'लिटरेचर' च्या पर्यायवाची म्हणून त्याचा स्वीकार केल्यामुळे त्याच्या अर्थाविषयी अनिश्चितता वा अस्थिरता निर्माण झाली आहे. संस्कृतात या शब्दाचे स्वरूप व प्रयोग पूर्णपणे स्पष्ट आहे. काव्य=साहित्य= रस-साहित्य (Creative Literture) साहित्याचा शाब्दिक अर्थ आहे – सहिताचा भाव अर्थात सहभाव. काही विद्वानांनी 'सहित' चा अर्थ हितसहित असा कल्याणमय लावण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु हा आधुनिक वाग्विलासच म्हणावा लागेल. काव्यशास्त्रात त्याला काही प्रमाण नाही. त्याचप्रमाणे गुरुदेव रवीन्द्रनाथांनी देखील आधुनिक विचाराच्या संदर्भात त्याचा अर्थ-विस्तार केलेला आढळून येतो. "सहित शब्दामध्ये साहित्यात मीलनाचा भाव स्पष्ट आहे. ही मीलन-भावाची एकात्मकता केवळ भाव, भाषा आणि ग्रंथ यांच्यापुरती मर्यादित नसून मानवाचे मानवाशी, भूतकाळाचे वर्तमानाशी मीलन असा आहे," परंतु हा देखील कवीच्या वैदग्ध्यतेचा परिणाम आहे. शास्त्रात त्याचा स्पष्ट अर्थ आहे– शब्द आणि अर्थाचा सहभाव : शब्दार्थयोः यथावत् सहभावेन विधा साहित्यविद्या – (राजशेखर). येथे सहभावाचा विशिष्ट अर्थ आहे. पूर्ण एकात्मकता. असा सहभाव ज्या दोघांपैकी कोणातही न्यूनपणा किंवा अलगपणा नाही आणि हाच साहित्याचा तात्त्विक अर्थ आहे. तेव्हा साहित्य म्हणजे वाङ्मयाचे असे स्वरूप ज्यात शब्द आणि अर्थाचे पूर्ण सामंजस्य आहे. साहित्य शास्त्राहून भिन्न आहे. कारण त्यात एकीकडे अर्थभारामुळे शब्द दबून जातो तसेच दुसरीकडे संगीताच्या संदर्भात शब्दांच्या लयसिंधूत अर्थाचा क्षय झाल्याशिवाय रहात नाही.

## धर्म

दुसरा शब्द आहे धर्म. धर्माचा व्युत्पत्त्यर्थ आहे – 'ध्रियते अनेन यः सः धर्मः' जो धारण

केला जातो तो धर्म. पदार्थाच्या अस्तित्वाला धारण करणारे प्राणतत्त्व, मूळ प्रवृत्ती, स्वभाव इत्यादी मूलभूत वैशिष्ट्ये किंवा गुण असतात. धर्माचा आणखीही एक अर्थ आहे तो म्हणजे कर्तव्यकर्म. हे कर्म मूळ अर्थाचेच विकासशील रूप आहे. कारण मूळ प्रवृत्ती क्रियाशील बनूनच कर्तव्याचे रूप धारण करते, म्हणूनच धर्माचा समन्वित अर्थ आहे– प्रकृति आणि कर्तव्यकर्म.

याप्रमाणे साहित्य-धर्मातर्गत विवेचनाचा विषय आहे– 'आधुनिक समीक्षा-शास्त्राच्या शब्दावलीत 'ललित-वाङमयाचा स्वभाव आणि उद्देश' आणि संस्कृत काव्यशास्त्राच्या शब्दावलीत "काव्यात्मा आणि प्रयोजन".

प्रथम निवेदन केल्याप्रमाणे शास्त्राचे प्राण-तत्त्व म्हणजे शब्द आणि अर्थाचे तादात्म्य हे होय. अर्थाचे शब्दाशी पूर्ण तादात्म्य वाणीचा सर्वोत्कर्ष बिन्दू होय. तात्त्विक दृष्टया अर्थ म्हणजे आत्म्याची अनुभवमय नि ज्ञानमय स्थितीच; आणि शब्द म्हणजे प्रगट करावयाचे ते. अर्थात् अर्थाचे शब्द-रूपात प्रगटीकरण. आत्म-साक्षात्का-राची एक प्रमुख प्रक्रिया आहे. भारतीय काव्य –दर्शनात याच तर्काच्या आधारावर अर्थाला शिव आणि शब्दाला शक्ती म्हटले आहे. – 'रुद्रोऽर्थः अक्षरस्सोमा' आणि त्या दोघांच्या अर्धनारीश्वर-रूपात साहित्याची कल्पना केली आहे. आत्म-साक्षात्कार म्हणजेच आनंद. प्रकृतीच्या विविध उपादानातून आत्मा आपला साक्षात्काराचा आविष्कार करण्याचा प्रयत्न करीत असतो. हा प्रयत्न किंवा साधना म्हणजेच जीवनसाधनेचे साफल्य-वैफल्य. सुख-दुःख आणि त्याची सिद्धी म्हणजेच 'आनंद' होय. हा आनंद सुखदुःखा-पलीकडील आत्म-लाभ-अनुभूतीच्या स्थितीचे द्योतक होय. आनंदाचे मूळ रूप एक असून अखण्ड आहे. माध्यमभेदामुळे त्याच्या नावात भिन्नता असू शकते. वाणीच्या माध्यमातून जी आत्म-सिद्धी प्राप्त होते त्याचे शास्त्रीय नाव रस होय. या व्याख्येनुसार अर्थ आणि शब्दाचे साहित्य म्हणजे सहज-रसमय साहित्य. रस त्याचे अन्तर्गत लक्षण आहे; बाह्यात्मक विशेषण नव्हे. एका शब्दात साहित्याची प्रकृती किंवा प्राणतत्त्व–रस आहे आणि तेच त्याचे प्रयोजनदेखील. भारतीय काव्य शास्त्राचे विवेचन इतके मार्मिक आहे की त्याचे लक्षण आणि प्रयोजन, साधना आणि सिद्धी, शरीर आणि आत्मा यांचे द्वंद्वात्मक स्वरूपच शिल्लक रहात नाही.

## २ भारतीय साहित्याची मूलभूत एकता

भारत अनेक भाषांचा विशाल देश आहे. वायव्येस पंजाबी, हिंदी व ऊर्दू, पूर्वेस उडीया, बंगाली आणि आसामी, मध्यभागी मराठी आणि गुजराथी, दक्षिणेस तामिळ, तेलगु, कन्नड व मलमयालम, याशिवाय इतर कितीतरी अनेक भाषा आहेत, ज्यांचे साहित्यिक व भावनात्मक दृष्टीने कमी महत्त्व नाही. उदा० काश्मीरी, तुरू, डोंगरी, सिंधी, कोकणी इत्यादी. यातील प्रत्येकाचे, विशेषतः पहिल्या बारा भाषांचे आपले स्वतःचे असे वाङमय आहे. ते प्राचीन वैविध्यपूर्ण आणि परिणामाच्या दृष्टीने अत्यंत समृद्ध असे आहे. जर आधुनिक भारतीय भाषांच्या संपूर्ण वाङ्मयाचा संग्रह केला तर माझे असे अनुमान आहे की ते यूरोपातील संकलित साहित्यापेक्षा कोणत्याही दृष्टीने कमी असणार नाही. वैदिक-संस्कृत, संस्कृत, पालि, प्राकृत व अपभ्रंश आदींचा समावेश केला तर त्याचा अनंत विस्तार कल्प-नच्या पलीकडे होईल. आमचे अपार ज्ञान-भांडार हिंदी महासागरापेक्षा खोल, भारताच्या भौगोलिक विस्तारापेक्षा व्यापक, हिमालयाच्या शिखरापेक्षा उंच, व ब्रह्माच्या कल्पनेपेक्षा अधिक सूक्ष्म आहे.

वरील भाषेतील प्रत्येक साहित्याचे आपले स्वतंत्र व प्रभावपूर्ण वैशिष्टच आहे. त्यात त्या त्या प्रदेशाचे व्यक्तित्व प्रतिबिंबित झाले आहे. पंजाबी आणि सिंधी तसेच हिंदी आणि उर्दू यांच्या प्रादेशिक सीमा अगदीच मिळालेल्या आहेत. परंतु त्यांच्या साहित्याचे वेगळेपण किती स्पष्ट आहे. गुजराथी व मराठीचे समाज-जीवन तर परस्पर अगदी निकडीचे आहे यात शंकाच नाही. दाक्षिणात्य भाषांचा उगम एकच एक आहे. त्या सर्व द्रविड शाखेतून निघाल्या आहेत तरीदेखील कन्नड-मलयाळम व कानडी-तेलगु यांच्या



अनुक्रमणिका

स्वतंत्र स्वरूपाविषयी शंका घेण्यास जागा नाही. हीच बाब बंगाली, आसामी आणि उडीयासंबंधी म्हणता येईल. बंगाली भाषेचा प्रभाव पचवून आसामी व उडीया यांनी आपले स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवले आहे.

भाषेतील प्रत्येक साहित्यात स्वतःचे स्वभाव-वैशिष्टच स्पष्ट झाले आहे. तामीळचे संगम साहित्य, तेलगूचे द्वयर्थी-काव्य आणि उदाहरण व अवधान साहित्य, मलयाळमचे संदेश-काव्य व कीर-गीत तसेच मणिप्रवालम्-शैली, मराठीचे पोवाडे, गुजराथीचे आख्यान साहित्य व फाग, बंगालीचे मंगलकाव्य, आसामीचे बडगीत आणि बुरंजी साहित्य, पंजाबीचे रम्याख्यान व वीरगीत, उर्दूची गझल, आणि हिंदीचे रीतिकाव्य आणि छायावाद इत्यादी आपापल्या भाषा-वाङ्मयाच्या वैशिष्टचांनी उज्ज्वल बनल्या आहेत.

भाषेतील भेद मात्र मूळ स्वभावाचे नाहीत. जसे अनेक धर्म, विचारप्रणाली व जीवनप्रवाह अस्तित्वात असताना देखील भारतीय संस्कृतीचे ऐक्य असंदिग्ध आहे तसेच व त्याच कारणांमुळे अनेक भाषा व पद्धती असताना देखील भारतीय वाङ्मयाच्या मूलभूत ऐक्याचा शोध घेणे अगदी सहज शक्य आहे. भारतीय वाङ्मयाची विपुलता नि विविधपणा तर अपूर्व आहे. तिची ही मौलिकता व ऐक्य तर अधिकच आकर्षक आहे. येथे याच ऐक्यभावनेच्या आधारतत्त्वांचे विश्लेषण करावयाचे आहे.

दक्षिणेत तामीळ व उत्तरेस उर्दू सोडून भारताच्या जवळ जवळ सर्व भाषांचा जन्मकाळ बहुतेक एकच आहे. तेलगु साहित्याचे प्राचीन कवी नन्नय इसवी सनाच्या अकराव्या शतकात होऊन गेले. कन्नड साहित्याचा प्रथम उपलब्ध ग्रंथ 'कविराजमार्ग' राष्ट्रकूट वंशाचे राजे नृपतुंग यांनी ८ व्या शतकात लिहिला. ज्याच्या रचनाकाल व भाषास्वरूपाविषयी मतैक्य नाही असा मलयाळम भाषेतील सर्व प्रथम ग्रंथ "राम-चरितम्' तेराव्या शतकात लिहिला गेल्याचे मानतात. गुजराथी व मराठीचा निर्माणकाल जवळ जवळ एकच. गुजराथीचा पहिला ग्रंथ (इ. स. ११८५ मध्ये) शालिभद्र भारतेश्वरकृत 'बाहुबलिरास' हा असून मराठीचे प्राचीन वाङ्मय १२ व्या शतकात निर्माण झाले. पूर्वेकडील भाषा वाङ्मयाविषयी हेच अनुमान वस्तुस्थितीला धरून सत्य आहे. बंगालीच्या चर्या-गीतांची रचना १०-१२ व्या शतकांच्या दरम्यान झाली असावी. आसामी साहित्याचे सर्वात प्राचीन उदाहरण १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात सापडते. त्या भाषेतील सर्वश्रेष्ठ कवि हेम सरस्वती असून त्यांनी 'प्रल्हादचरित्' व 'हरगौरी-संवाद' ग्रंथ लिहिले. उडीया भाषेत देखील निश्चितपणे १३ व्या शतकात व्यंगात्मक काव्य आणि लोक-गीतांची रचना होऊ लागली. १४ व्या शतकातील उडीया भाषेचे कवि व्यास सारलादास प्रसिद्धच आहेत.

पंजाबी व हिंदी मध्येही ११ व्या शतकापासून साहित्य निर्माण होऊ लागले. केवळ दोनच भाषांचा जन्मकाळ वेगळा आहे. तामीळ संस्कृता-प्रमाणे प्राचीन असून ऊर्दू तर १५ व्या शतकात निर्माण झालेली भाषा आहे. जन्मकाल जर सोडला तर आधुनिक भारतीय भाषेतील वाङ्मय-विकासाचे टप्पे जवळजवळ सारखे आहेत. त्यांचा प्रारंभकाल १५ व्या शतकापर्यंत येतो. मध्य मोंगल-वैभवाच्या अखेरपर्यंत म्हणजेच १७ व्या शतकाच्या मध्यापर्यंत. उत्तरार्ध इंग्रजी-सत्तेच्या स्थापनेबरोबर होऊन नंतर आधुनिक कालाचा प्रारंभ. सर्वांच्या साहित्याचा विकासक्रम जवळ जवळ एकाच प्रकारे झालेला असून त्याचे समान असे चार कालखण्ड कल्पिले जातात.

समांतर विकासक्रमाचा आधार अगदी स्पष्ट असून तो तर भारताच्या राजकीय आणि सांस्कृतिक जीवनाच्या विकासक्रमाच्या मुळाशी देखील आढळून येतो. मध्यंतरी अनेक अडथळे येऊन देखील भारताची शेकडो वर्षांची अशी राजकीय-व्यवस्था कायम राहिली आहे. मोंगल-काळात तर जवळजवळ १५० वर्षेपर्यंत उत्तर-दक्षिण व पूर्व-पश्चिम प्रदेशाशी घनिष्ट संबंध



अनुक्रमणिका

चालू होता. मोंगलांची राज्यसत्ता खंडित झाल्या-नंतर देखील हा संबंध तुटला नाही. मोंगल-शासनाच्या आधीदेखील राज्यविस्ताराचे प्रयत्न होत राहिले. राजपूतात एकछत्र-भारत सम्राट कोणीच झाला नाही. परंतु त्याचे राजवंश मात्र भारतात अनेक भागावर शासन करीत होते. शासक-भिन्न असले तरी सामंत-शासन-पद्धती एकाच प्रकारची होती. मुसलमानांच्या शासनप्रणालीत देखील स्पष्टपणे मूलभूत समानता होती. नंतरच्या काळात इंग्रजींनी केन्द्रीय शासन कायम करुन या समानतेला अधिकच दृढमूल केले. या सर्व कारणांमुळे विविध-भाषा-प्रदेशांच्या राजकीय परि-स्थितीत बरेच साम्य आढळून येते.

राजकीय परिस्थितीच्या तुलनेत सांस्कृतिक परिस्थितीतील साम्य अधिक स्पष्ट आहे. गेल्या हजार वर्षात अनेक धर्म आणि सांस्कृतिक चळवळींचा प्रभाव संपूर्ण भारतावर झाला. बौद्ध धर्माच्या ऱ्हास कालात त्याच्या अनेक शाखा निर्माण झाल्या. तसेच शैव-शाक्त धर्माच्या संयोगाने नाथ-संप्रदायाचा प्रादुर्भाव झाला. या सम्प्रदायाचा प्रसार इ. स. पूर्व, २०० वर्षे अगोदर उत्तरेस तिबेटात, दक्षिणेस पूर्वघाटावर, पश्चिमेस महाराष्ट्रात व पूर्वेस जवळजवळ सर्व प्रदेशात झाला होता. नाथ-शैवादि पंथात हठयोगादींना प्राधान्य असताना देखील साधुसंतांच्या साधनेत जीवन विषयक विचार व सौंदर्यादी भावनांची उपेक्षा नव्हती. अनेक साधुसंतांनी काव्याच्या माध्यमातून आत्माभिव्यक्ती व सिद्धांताचे प्रतिपादन केले. भारतीय भाषांच्या विकास-क्रमातील पहिल्या टप्प्यात या पंथ-सम्प्रदायाचा प्रभाव स्पष्ट दृग्गोचर होतो. त्यानंतरच्या काळात उत्तराधिकारी संत-संप्रदायाचा व नवीन आगमन झालेल्या मुसलमान सूफी-मतांचा प्रसार देशाच्या विभिन्न भागात होऊ लागला. संत-संप्रदाय वेदान्त- तत्व-ज्ञानाने प्रभावित होते व निर्गुण -भक्तीची साधना व प्रचार ते करीत. सूफी-तत्त्वज्ञानात देखील निर्गुण ब्रह्माची उपासना होती परंतु त्याचे वेगळेपण उत्कट-प्रेमानुभूतीच्या माध्यमात दिसून येते. प्रामुख्याने सूफी संतांचा प्रभाव भारताच्या उत्तर-पश्चिमेस दिसून येत असला तरीदेखील दक्षिणेच्या विजापूर-गोवळकोंडा राज्यात त्यांची अनेक केन्द्रे आढळून येतात. नंतरच्या काळात वैष्णव आंदोलनाचा प्रारंभ होऊन फार वेगाने त्याचा देशभर प्रसार झाला. संपूर्ण भारत जणु सगुण-ईश्वराच्या लीलागीतांनी मोहित झाला. रामभक्ती व कृष्णभक्तीच्या अनेकविध आक-र्षक भक्ति-पद्धतींचा प्रसार समस्त भारतात झाला. तिकडे मुस्लिम संस्कृती नि सभ्यतेचा प्रभाव निरंतर वाढत होता व इराणी संस्कृतीची वैभव-विलास, अलंकार-सजावट इत्यादी अनेक आकर्षक-तत्त्वे भारतीय जीवनप्रवाहात फार मोठ्या वेगाने एकजीव होत होती. एक नवीन दरबारी, शहरी-संस्कृती उदयास येत होती. राजकीय व आर्थिक अस्थैर्यामुळे या संस्कृतीचा मोहक प्रभाव जास्त टिकू शकला नाही. परंतु विकासशील व आनंदमय जीवनाच्या जागी रोगट विलासमय जीवन मात्र शिल्लक राहिले. अशाच वेळी पाश्चात्य व्यापाऱ्यांचे आगमन झाले. त्यांनी आपल्या बरोबर आपली संस्कृती नि शिक्षणपद्धतीही आणली मग काय येशूच्या प्रचारकांचे थवेच्या थवे भारतात येऊ लागले. १९ व्या शतकात इंग्रजांचे प्रभुत्व प्रस्थापित झाले आणि शासकवर्गाने मोठ्या परिश्रमाने आणलेल्या योजना आपल्या शैक्षणिक पद्धतीने आणि संस्कृतीच्या माध्यमातून राबवून प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे स्वतःच्या धर्माचा प्रसार व प्रचार सुरू केला. अशा प्रकारे प्राचीन आणि आधुनिक पाश्चात्यांच्या संबंधातून नि संघर्षातून आधुनिक नव्या भारताचा जन्म झाला.

भारताच्या आधुनिक भाषा-वाङ्मयाच्या विकास-क्रमात कितीतरी समान गोष्टी आढळून येतात. विदेशी धर्मप्रचारकांच्या व शासकांच्या प्रयत्ना-मुळे पाश्चात्य सभ्यता व संस्कृतीशी संबंध व संघर्ष व त्यातून नव्या पुनर्जागरण-युगाचा उदय, राष्ट्रीय आंदोलनाच्या प्रेरणेतून वाङ्मयीन क्षेत्रात राष्ट्रीय व सांस्कृतिक भावनेचा उत्कर्ष, साहित्यात नीतिवाद व सुधारणावादाविरुद्ध प्रतिक्रिया व नव्या रोमँटिक सौंदर्य-भावनेचा उन्मेष, चौथ्या

दशकातील साम्यवादी विचारप्रणालीच्या प्रचारामुळे द्वंद्वात्मक भौतिकवादाचा प्रभाव, इलियट सारख्यांच्या प्रभावामुळे जीवनाच्या दमित भावना व स्वप्नांना शब्दांकित करण्याचे नवनवीन प्रयोग. व शेवटी स्वातंत्र्योत्तर कालातील विश्वकल्याणाच्या भावनांनी प्रेरित राष्ट्रीय व सांस्कृतिक चैतन्याचा विस्तार-हीच आधुनिक भारतीय-वाङ्मय विकासाची रूपरेखा आहे. भारताच्या सर्व भाषेत ही सारख्या प्रमाणात दिसून येते.

आता साहित्याच्या मूलभूत आधाराविषयी विचार करू. भारतीय भाषांचे उगमस्थान जरी एक नसले तरी त्यांच्या साहित्याचा मूलभूत आधार समान आहे. रामायण, महाभारत, पुराण, भागवत, संस्कृतचे अभिजात वाङ्मय – कालिदास, भवभूती, बाण, श्रीहर्ष, अमरुक आणि जयदेव इत्यादींच्या अमरकृती, पालि, प्राकृत व अपभ्रंश-मध्ये लिखित बौद्ध, जैन तसेच इतर धर्मांचे साहित्य आदी उत्तराधिकार भारतीय भाषांना मिळाला आहे. शास्त्रीय क्षेत्रात उपनिषद, षड्-दर्शन, स्मृति, इत्यादी, तसेच काव्यशास्त्रावरील अनेक महान ग्रंथ – नाट्यशास्त्र, ध्वन्यालोक, काव्यप्रकाश, साहित्यदर्पण, रसगंगाधर व इतर ग्रंथांच्या वैचारिक संपदेचा उपयोग सर्वांना निरंतर होत आला आहे. आधुनिक भारतीय भाषांचे हे अक्षय भांडार आहे. व त्यापासून सर्वांना समान प्रेरणा मिळाली आहे. हा प्रभाव निश्चितपणे समन्वयकारी असून प्रेरणा ग्रहण केलेल्या साहित्यात एक प्रकारची मूलभूत एकता स्वाभाविकपणे निर्माण झाली आहे. अशा प्रकारे सारख्याच राजकीय, सांस्कृतिक आणि साहित्यिक आधारभूमीवर पल्लवीत व पुष्पित भारतीय वाङ्मयात जन्मजात समान भावना दिसून येणे ही एक स्वाभाविक घटना म्हणावी लागेल.

आतापर्यंत भारतीय वाङ्मयाच्या विषय-स्वरूपाकडे, भावनात्मक ऐक्याकडे अंगुलीनिर्देश केला परंतु काव्यशैली व काव्यस्वरूपातील समानता देखील कमी महत्त्वाची नाही. भारतीय वाङ्मयास संस्कृतापासून मिळालेल्या काव्यशैली महाकाव्य, खण्डकाव्य, मुक्तक, आख्यायिका इ० तसेच अपभ्रंश-परम्परेतील अनेक शैलीप्रकार– चरितकाव्य, प्रेमगाथा-शैली, रास, पद-शैली इ. सारख्या स्वरूपात आढळतात. अनेक वर्णिक छंदाशिवाय अनेक देशी छंद–उदा० दोहा, चौपाई इत्यादी लोकप्रिय छंद आढळतात. आधुनिक कालात पाश्चात्य वाङ्मयीन काव्य रूपांचा आणि छंदांचा (उदा० प्रगीत, गंधकाव्य इत्यादी) प्रचार सर्व भाषांतून झालेला दिसून येतो. भाषांच्या उगमाविषयी हाच अनुभव आहे. प्रामुख्याने भारतीय भाषा जरी आर्य आणि द्रविड या दोन भिन्न शाखेच्या असल्या तरी प्राचीन कालातील संस्कृत, पालि, प्राकृत तसेच अपभ्रंश, व आधुनिक युगातील इंग्रजीच्या प्रभावामुळे भाषास्वरूपात आणि शब्दात अनेक प्रकारची समानता सहजपणे दिसून येते. भारतीय भाषांनी आपल्या व्यंजनात्मक व लक्षणिक शक्तीच्या विकासासाठी, प्रतीकात्मक शब्द व पर्याय शब्द घडविण्यासाठी तसेच नवीन शब्द-निर्मितीसाठी निरंतर संस्कृतच्या अक्षय भांडाराचा उपयोग केला आहे. इंग्रजी भाषेत लाक्षणिक व प्रतीकात्मक शब्दशक्तींचा अधिक विकास झाला आहे. गेल्या ५० वर्षात भारतीय भाषांनी इंग्रजी वाङ्मय-प्रयोगातील बारकावे, वाक्प्रचार, इत्यादींचा प्रयत्नपूर्वक स्वीकार केला आहे. गद्य वाङ्मयावर तर इंग्रजीचा प्रभाव आणखी जास्त दिसून येतो. आमची वाक्यरचना जवळ जवळ इंग्रजी धाटणीची बनलेली आहे. तेव्हा या सर्व प्रयत्नामुळे वाङ्मयाच्या माध्यम भाषेत एक प्रकारची आंतरिक समानता दिसून येते. सर्वत्र समान विषयांच्या अस्तित्वामुळे तर ती अधिकच दृढ होत गेली आहे.

तेव्हा 'विविध भाषांतून अभिव्यक्त झालेला एक विचार म्हणजेच भारतीय साहित्य होय' असे विधान करणे फारसे धाडसाचे होणार नाही. आमच्या देशाचे दुर्भाग्य आहे की स्वातंत्र्यप्राप्ती-पर्यंत पाश्चात्य प्रभावामुळे संकुचित मनोवृत्तींना अधिक प्रोत्साहन मिळाले. याविषयी मूलभूत ऐक्याच्या दृष्टीने अजून संशोधन व्हायचे आहे. तटस्थ भावनेने, सत्यसंशोधनावर दृष्टी केन्द्रित

करून भारतीय वाङमयात अस्तित्वात असलेल्या समान तत्त्वांचा आणि प्रवृत्तींचा शास्त्रशुद्ध अभ्यास करणे अत्यंक आवश्यक आहे. या कार्यासाठी आम्हाला आमच्या अभ्यास-संशोधन पद्धतीत बदल घडवून आणावे लागतील. कोणत्याही विशिष्ट प्रवृत्तीचा अभ्यास केवळ एका भाषेच्या वाङमया-पर्यंत सीमित असून चालणार नाही. असे अध्ययन अपूर्ण म्हणावे लागेल. उदा० 'मधुराभक्ती' संबंधी अभ्यास करणारा जर स्वतःला केवळ हिंदी किंवा बंगाली भाषेच्या अभ्यासापुरता सीमित मानेल तर त्याचे संशोधन अयशस्वी म्हणावे लागेल. त्याला आपल्या भाषेव्यतिरिक्त इतर भाषेतील वाङमयात प्रवाहित असलेल्या 'मधुराभक्ती' विषयींच्या विभिन्न प्रवाहांचा शोध घ्यावा लागेल. कारण गुजराथी, उडीया, आसामी तमिळ, तेलगु आणि कन्नड इत्यादी भाषा मधुरा-भक्ति–रसाने सारख्या प्रमाणात परिप्लावित झाल्या आहेत. एकाच भाषेचा अभ्यास केल्यास तो सदोष राहील. हिंदी-साहित्याच्या इतिहास-कारांना ज्या अनेक घटना योगायोगाने आलेल्या वाटतात. त्या वस्तुतः तशा नाहीत. आचार्य रामचंद्र शुक्लांना हिंदीच्या विशाला गीत-वाङमयाच्या परम्परेचे उगमस्थान शोधण्यात अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. वास्तविक अपभ्रंश, सोडल्यास दाक्षिणात्य भाषासमूहात तसेच बंगालीत ते सहज शोधणे शक्य होते. सूरदासाचे अभूतपूर्व वात्सल्य-वर्णन हिंदी-काव्यविश्वातील आकस्मित किंवा ऐकांतिक घटना नव्हती. गुजराथीचे कवि भालणने आपल्या आख्यानात, १५ व्या शतकात मलयाळम कवीने कृष्णगाथेत, आसामी भाषेचे कवि माधवदेवने आपल्या बडगीतात तल्लीन होऊन बाल-कृष्णाच्या बाल-लीलांचे वर्णन केले आहे. भारतीय भाषांतून उपलब्ध रामायण आणि महाभारत -काव्याचा तौलनिक अभ्यास केल्यास कितीतरी प्रश्नांचा अन्वयार्थ लागण्यास मदत होईल. रम्याख्यान काव्यातील असंख्य कथानके आणि रुढींचा अभ्यास विविध भाषेतील प्रेमाख्यान काव्याच्या अध्ययना-शिवाय पूर्ण होणार नाही. सूफी-काव्यातील मर्म समजून घेण्यासाठी फारसी व्यतिरिक्त काश्मीरी, सिंधी, पंजाबी व ऊर्दू या विविध भाषेतील तत्संबंधी वाङमयाचा फार मोठा उपयोग होऊ शकेल. तुलसीकृत 'रामचरित-मानस' ग्रंथातील राम-चरित्राच्या स्वरूपाची कल्पना आत्म-सात केल्याशिवाय इतर भाषेतील राम-काव्याचे अध्ययन अपूर्ण राहील. त्याप्रमाणे हिंदीतील अष्टछाप कवींचा (कृष्णभक्त) प्रभाव बंगाली व गुजराथीवर अप्रत्यक्षपणे व्याप्त दिसून येतो. तेथील कृष्ण-काव्याचे सम्यक् विवेचन करताना विभिन्न प्रभावाकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. अशा प्रकारे साहित्यांतर्गत असलेल्या प्रवाहाच्या संशोधन–प्रणालीमुळे अनेक अदृश्य दुवे अनायास सापडतात. अनेक प्रकारे जिज्ञासा-समाधान होते व भारतीय ज्ञान-परम्परेची नि भावनात्मक चैतन्याची अखण्ड शृंखला सहज प्रत्ययास येते.

हे कार्य महत्त्वाचे असले तरी सोपे नाही. पहिली अडचण भाषेची. आतापर्यंतच्या संशोधन-कारांचे लक्ष स्वभाषेशिवाय इंग्रजी व संस्कृत पर्यंतच सीमित राहिले आहे. विविध प्रादेशिक भाषा-भगिनींशी त्यांचा संबंध नाही. अशा स्थितीत प्रस्तुत योजना शुभ असूनदेखील कल्पना म्हणूनच राहण्याची भीती आहे. मार्गातील अडचणींना तोंड देणे अशक्य नाही. व्यवस्थितपणे पूर्वनियोजित कार्यक्रमाने अडचणींचे निराकरण होऊ शकते. काही भाषा-समहांचे तर थोड्या परिश्रमाने अभ्यास व आकलन होऊ शकते. त्यातील रूपांतरच काय लिपि-भेद पाहण्याची देखील आवश्यकता नाही. उदा० बंगाली, आसामी, आणि उडीया भाषेत किंवा हिंदी आणि मराठीत किंवा तेलगु आणि कन्नड मध्ये काही शब्द व शब्द-रूपांचे अर्थ पाहून काम चालू शकते. हिंदी, ऊर्दू व पंजाबी मध्ये लिपि-भेद व कठीण शब्दार्थ पाहून भागण्यासारखे आहे. हाच नियम हिंदी-गुजराथी तसेच तामिळ-मलयाळम विषयी लागू शकेल. इतर भाषांसाठी भाषांतराचा आधार घेता येईल. या शिवाय वाङमयेतिहास, परिचय, तौलनिक अभ्यास, तौलनिक संशोधन, आन्तर-भाषेतील परिसंवाद, इत्यादींची व्यवस्था केल्यास परस्पर भाषेतील देवाणघेवाण सुलभ होईल. आज

देशात याविषयी जागृती निर्माण झाली असून काही संस्था त्या दिशेने अग्रेसर होत आहेत. तरीसुद्धा हे कार्य प्राथमिक अवस्थेत आहे असेच म्हणावे लागेल. यासाठी आवश्यक त्या संघटित प्रयत्नांची आवश्यकता असून त्यांचे आयोजन अजून होऊ शकले नाही. त्या दृष्टीने वाङ्मयातील चैतन्य जागृती मात्र एक शुभ लक्षण मानावे लागेल.

भारताच्या राष्ट्रीय ऐक्यासाठी सांस्कृतिक ऐक्याचा आधार आवश्यक असून सांस्कृतिक ऐक्याला सर्वात दृढ व स्थायी स्वरूपाचा आधार म्हणजे साहित्य हा होय. ज्याप्रमाणे अनेक निराशावादींच्या शंकांना धुडकावून भारताने आपली स्वतःची अखंडता कायम ठेवली व उत्कर्ष साधला त्याप्रमाणे एक 'समन्वयात्मक घटक' या नात्याने 'भारतीय वाङ्मया' चा विकास हळूहळू होत आहे. जर मूलभूत भाव-चैतन्य एक आहे तर भाषिक–माध्यम–भेद असताना देखील वाङ्मयाचे व्यक्त रूप देखील भिन्न असू शकत नाही.

## ३ कविता म्हणजे काय ?

कविता म्हणजे काय ? हा एक मोठा बिकट प्रश्न आहे. अनेक समीक्षक असे समजतात की कवितेची व्याख्या व तिच्या स्वरूपाचे विवेचन करणे अशक्य आहे. परंतु माझे मन सहसा इतक्या लवकर पराजय स्वीकारण्यास तयार नाही. तसे पाहिल्यास जीवनाची सर्व सूक्ष्म नि गहन तत्त्वे सहजपणे परिभाषेचे बंधन स्वीकारीत नाहीत. परंतु तरीदेखील ज्या प्रमाणात अनुभूती शक्य आहे त्या अनुभूतीचे विवेचन मी अशक्य मानीत नाही. ते अपूर्ण असू शकेल, परंतु अपूर्णता तर भाषेची स्वाभाविक परिसीमा आहे. ती तर कोणत्याही अनुभवाच्या अभिव्यक्ती-विषयी म्हणता येईल. तर मग कवितेच्या व्याख्ये-विषयी इतकी निराशा का ? मी एक उदाहरण देऊन या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करतो.

स्याम गौर किमि कहहुँ बखानी ।
गिरा अनयन नयन बिनु बानी ॥

तुलसीदासाच्या उत्कृष्ट कवितेतील हे एक उदाहरण आहे. शेकडो वर्षांपासून सहृदय समाज त्यांच्या कवित्वाची मुक्त कंठाने स्तुती करीत आला आहे. आचार्य रामचंद्र शुक्ल व 'हरिऔध' सारख्या समर्थ साहित्यिकांनी त्यांचे यशोगान केले आहे.

रामलक्ष्मणाच्या सौंदर्याने प्रभावित झालेल्या सीतेच्या सखीची ही स्वाभाविक भावाभिव्यक्ती आहे. घनश्याम राम आणि गौरवर्ण लक्ष्मणाच्या सौंदर्याचे वर्णन आणखी कशा प्रकारे होऊ शकते ? वर्णन करणारी वाणी एक माध्यम असून ते नेत्र-विहीन आहे. आणि सौंदर्यदर्शनाचे माध्यम डोळे असून त्यास वाणी नाही. अर्थात् नेत्र सौंदर्याचा आस्वाद तर घेऊ शकतात परंतु वर्णन करू शकत नाहीत उलटपक्षी वाणी सौंदर्याचे वर्णन करू शकते परंतु आस्वादाचे कार्य तिला शक्य नाही. कवितेतील मूळभाव म्हणजे - सौंदर्याकडे प्रबळ सात्विक आकर्षण – या शब्दात पुरुषांच्या सौंदर्याकडे स्त्रीच्या स्वाभाविक आकर्षणाची भावना स्पष्ट आहे. यात आकर्षणाच्या भावनेत वासनेचा स्पर्श नाही. याचाच अर्थ वैयक्तिक इच्छा व तिच्या पूर्ततेसाठी ऐंद्रिक व मानसिक सुखाची इच्छा यांचे मिश्रण नाही. तेव्हा येथे सात्विक सौंदर्याचे चैतन्य स्पष्ट झाले आहे. औचित्याच्याही दृष्टीने ही व्यंजकता स्तुत्य आहे. राम आणि लक्ष्मण अजून परपुरुष आहेत. कवीच्या कल्पनेनुसार ते दोघे सीता आणि ऊर्मिला यांचे वरेण्य आहेत. या दृष्टीने सखीच्या भाव व्यंजनेत वासनेचा समावेश कोणत्याही प्रकारे उचित नव्हता. कवीला तर येथे सीतेच्या विवाह-दशेचे वर्णन करावयाचे आहे. तेव्हा सखीच्या या भावनाप्रधान उक्तीत ती फक्त आश्चर्य आणि उल्हासयुक्त तीव्र आकर्षणाची भावना व्यक्त करते. सारांश वरील काव्यात औचित्य-अनुमोदित अर्थात नैतिक मनोवैज्ञानिक दृष्टीने शुद्ध जीवनाचे अत्यंत मधुर भाव तसेच कुमार वयाच्या आकर्षणाची अभिव्यंजना झाली आहे.

आता व्यंजकतेच्या दृष्टीने पाहू या. प्रस्तुत कवितेत कवीला सौंदर्यापासून निर्माण होणाऱ्या प्रभावांचे प्रसरण अपेक्षित आहे. सौंदर्यप्रभाव

हा निश्चितच अपूर्ण अमूर्त असून ती एक मिश्र-प्रतिक्रिया आहे. त्यात रति, उल्हास, क्रीडा इत्यादी भावनांचा समन्वय झालेला आढळून येतो. सांगणाऱ्याच्या 'मुग्ध' अवस्थेमुळे 'अभिव्यंजना' अधिक कठीण होत जाते, म्हणून कवीने वर्णन करण्याचा प्रयत्नच केला नाही. 'किमि कहहुँ बरवानी' या उक्तिद्वारे म्हणजेच वर्णनाच्या असमर्थपणाची कबूली देऊन सौंदर्याची अनिर्वचनीयता सूचित केली आहे. ही अनिर्वचनीयता 'अतिशया' ची द्योतक आहे. अनिर्वचनीयता अनुभवातीत मात्र खास नाही. वास्तविक कवीला अत्यंत प्रबळ अनुभूती होत आहे. अर्थात सौंदर्यानुभूतीच्या तीव्रतेला अभिव्यक्त करण्यासाठी कवीजवळ शब्द नाहीत. अशा प्रकारे कवि सौंदर्याच्या तीव्र व सूक्ष्म अनुभूतीचे प्रत्यक्ष वर्णन न करता असमर्थपणातूनच त्याची व्यंजना सूचित करतो. ही वर्णनाची वक्रशैली झाली. कुंतकने यालाच 'संवृति वक्रता' असे म्हटले आहे. दुसऱ्या ओळीत असमर्थपणाचे कारण दिले आहे. वाणीला नेत्र नाहीत व नेत्रांना वाणी नाही. अलंकारशास्त्रात यालाच अर्थांतरन्यास म्हणतात. या उक्तीत लक्षणेचा चमत्कार आहे. कारण शरीररहित वाणीमध्ये नेत्रांची व नेत्रात वाक्-शक्तीची कल्पना व्यावहारिक दृष्टीने निराधार आहे. परंतु लक्षणेच्या आधारावर ही उक्ती सार्थक बनली आहे. याशिवाय येथे स्पष्ट विरोधाभास देखील स्पष्ट आहे. प्रत्यक्षात जरी हे स्पष्ट असले तरी लक्षणेचा आधार त्यात तर्काची शक्ती उत्पन्न करुन देतो. वाच्यार्थ व लक्ष्यार्थातील हा विरोधाभास निश्चितच चमत्काराचे कारण बनतो. प्रारंभीच्या दोन्ही शब्दात (श्याम आणि गौर) चमत्कार स्पष्ट आहे. ध्वनिवादी याला पर्यायध्वनी, वक्रोक्तिवादी विशेषण-वक्रता आणि अलंकारवादी लक्षणामूलक अलंकार असे नाव देतात.

आता नाद-सौंदर्याच्या दृष्टीने पाहू या. वर उल्लेखिलेल्या काव्यात प्रसन्न पदावलीतून सूक्ष्म-वर्णमालेचा नाद-सौंदर्याचा कोमल ध्वनी स्पष्ट आहे. कवीने प वर्ण आणि क वर्णमालेची आवृत्ति व दुसऱ्या ओळीत न ची आवृत्ती साधून सहजरीत्या वर्णसमन्वयावर आश्रित शब्द-संगीत निर्माण केले आहे. याशिवाय लघु-मात्रिक चौपाई छंद मुग्धाच्या मनातील भाव तरंगाचा उपयुक्त माध्यम बनला आहे.

आता प्रश्न हा आहे की यातील कोणत्या तत्त्वाला आम्ही कविता म्हणावे ? सौंदर्य- चेतनेला की उक्ति-वक्रतेला, अलंकाराच्या चमत्कृतीला की वर्णमालेला की छंद-संगीताला ? उत्तर देणे फार कठीण आहे. येथे मूळ भाव कविता नाही. स्वाभाविकपणे ही एक सौंदर्यानुभूती आहे. आणखी काहीही असू शकते. परंतु भाव म्हणजे कविता नव्हे. पशुपक्षींना देखील भावानुभूती असू शकते. पण ती काही कविता म्हणता येणार नाही. प्रत्येक स्त्रीपुरुष एवढेच नव्हे तर दुसऱ्या योनीतील नर-मादी परस्परांच्या यौवन-सौंदर्याकडे आकृष्ट होतात पण या सर्व आकर्षणाला कविता म्हणता येणार नाही.

तर मग उक्ति-वक्रता म्हणजे काय ? सौंदर्याच्या या अनुभवाला विदग्धरीतीने शब्द-बद्ध करणे कविता होईल काय? नाही. कारण आमच्या दररोजच्या व्यवहारात आम्ही आमच्या आशेला न जाणो कित्येक वेळा अनेक प्रकारच्या शब्दांनी व्यक्त करीत असतो. ती तर कविता होऊ शकत नाही. मग काय अलंकाराचा चमत्कार– नेत्र आणि वाणीचा लाक्षणिक प्रयोग, किंवा वाच्यार्थलक्षार्थ यातील सूक्ष्म विरोधाभास म्हणजे कविता काय ? येथे कित्येक काव्यरसिक तर्कवितर्क करतील पण माझे स्पष्ट मत आहे. नाही.

(कारण) बोलताना आम्ही नेहमी न कळत अनेक वाक्-प्रचारांच्या रुपाने कित्येक लाक्षणिक प्रयोग करीत असतो. विरोधाभासाचा चमत्कार देखील शिक्षित व्यक्तीच्या दृष्टीने एक साधारण चमत्कार आहे. हे सर्व म्हणजे कविता नाही. त्याचप्रमाणे सामान्य माणसाच्या कल्पनात्मक समर्थनाला देखील कविता कसे म्हणता येईल ? नवीन समीक्षाशास्त्राच्या शब्दावलीत उक्ति-वक्रता,

लाक्षणिक प्रयोग, अलंकार-चमत्कार इत्यादीमध्ये कल्पना-वैभव आहे. थोडक्यात असे म्हणता येईल की केवळ भाव म्हणजे कविता नव्हे तसेच केवळ कल्पना देखील कविता असू शकत नाही.

आता संगीत-तत्त्वाविषयी. वर्ण-संगीत आणि लय-संगीताला देखील कविता म्हणता येणार नाही. कारण वर्ण-संगीत आणि लय-संगीत दोन्हीही निरर्थक पदावलीमध्ये येऊ शकतात.

तर मग वास्तविक अर्थाने कविता म्हणजे काय? या सर्व तत्त्वांचे समन्वयात्मकरूप म्हणजे कविता. वर उल्लेखिलेली संपूर्ण पदावली कविता आहे. सौंदर्य-चेतना कविता नाही. अर्थांतरन्यास अलंकार कविता नाही. वर्ण-संगीत कविता नाही. पदावलीतील लय देखील कविता नाही. या सर्वांचा समन्वय कविता आहे – अर्थात् रमणीय-भाव, उक्ति-वैचित्र्य आणि – वर्ण-लय संगीत तिन्ही मिळून कवितेचे स्वरूप सिद्ध होते. आता असा प्रश्न निर्माण होतो की कवितेसाठी या तिघांची उपस्थिती आवश्यक आहे काय? यापैकी कोणत्याही एकाचा अभाव कवितेच्या निर्मितीला बाधक होईल काय? उदा० रमणीय-भाव-तत्त्वा-शिवाय कविता होऊ शकेल काय? याचे उत्तर देण्यापूर्वी रमणीय शब्दाचा आशय स्पष्ट करणे आवश्यक आहे. रमणीय म्हणजे केवळ माधुर्ययुक्त नव्हे – कोणताही भाव ज्यात मानवी मनास रममाण करण्याची शक्ती असते, ते रमणीय. या दृष्टीने क्रोध, ग्लानि, शोक इ. भावांचे विशेष रूप देखील रमणीय असू शकते. काव्यात त्याचाच समावेश असतो. मला असे म्हणावयाचे आहे की, केवळ प्रेम, श्रद्धा, विस्मय, इत्यादी सुखद भाव रमणीय नसतात तर शोक, ग्लानि, अमर्ष इत्यादी अप्रिय भाव देखील रमणीय होऊ शकतात. शृंगारासारख्या माधुर्ययुक्त भावनांची देखील अनेक रूपे अ-रमणीय व औचित्यरहित असू शकतात. जीवनाच्या अशाच अनुभूतींची रूपे रमणीय असू शकतात-- ज्यामुळे हृदयाचे तादात्म्य स्थापित होऊ शकेल व हृदयाच्या अंतर-वृत्तीत एकात्मता स्थापित करण्याची शक्ती निर्माण होईल. भावनांची रमणीयता म्हणतात ती हीच. प्रश्न असा निर्माण होतो की या रमणीय भाव-तत्त्वाच्या अनुपस्थितीत कविता शक्य आहे काय? माझे स्पष्ट उत्तर आहे, नाही. त्याच्या अभावात जो चमत्कार आढळून येणे शक्य असेल तो केवळ बौद्धिक चमत्कार असू शकेल. उदा० गूढ रहस्यात्मक प्रश्न निर्माण करून त्याची उत्तरे देणे इ० तथाकथित चित्र-काव्यात हेच तत्त्व आढळून येते. बौद्धिक चमत्कार कवितेचा धर्म नाही. म्हणून ज्या पदावलीतून केवळ बौद्धिक चमत्काराचे सृजन होते ती कविता नव्हे.

दुसरे तत्त्व म्हणजे उक्ति-वैचित्र्य. उक्ति वैचित्र्याशिवाय कविता शक्य आहे काय? उत्तराच्या दृष्टीने अनेक मतभेद आढळून येतात. आचार्य शुक्ल सारखे रसज्ञ म्हणतात की होऊ शकते. प्राचीन रसवादी आचार्यांचेही हेच मत होते. आचार्य शुक्लांचा देखील तोच आधार असावा. परंतु मला मात्र शंका आहे. आनंद-वर्धनादी रस-ध्वनिवादी तर ध्वनीबरोबर कल्पनेची अनिवार्यता मानून काव्योक्तीत वैचित्र्याची स्थिती मानतात. कारण कल्पनेच्या योगालाच वैचित्र्य म्हणतात. आचार्य शुक्लजींनी देखील अनेक प्रसंगात या भाव-प्रेरित वक्रतेचा पुरस्कार केला आहे. असे असूनदेखील पूर्वीच्या चमत्कारवादावर रुष्ट होऊन सैद्धांतिक पातळीवर त्याचा निषेध करतानाही आढळतात. मला खेदाने म्हणावे लागते की आचार्य शुक्लजींचे हे मत मला मान्य नाही. कारण त्यात एका अतिवादाच्या विरुद्ध दुसरा अतिवाद प्रस्थापित केला असून मनो-वैज्ञानिक सिद्धांताचे खंडन झाले आहे. मनो-भावनांच्या स्पंदनाबरोबर वाणीचेही स्पंदन होते हा सिद्धांत आहे. यासाठीच व्यापक अर्थाने उक्तिवैचित्र्याचा प्रभाव कवितेत शक्य नाही. प्रकारान्तराने असे म्हणता येईल की, उक्ति-वैचित्र्याच्या अनुपस्थितीत कविता होऊ शकत नाही.

तिसरे तत्त्व म्हणजे संगीत. याविषयी तर अनेक मतभेद आहेत. संस्कृत-काव्यशास्त्रानुसार



अनुक्रमणिका

छंद कवितेचे वैकल्पिक उपकरण आहे. हिंदीच्या मध्ययुगातील वाङ्मयपंडितांनी छंदाच्या अनुपस्थितीत कविताच काय वाङ्मयाच्या कोणत्याही रूपाची कल्पना शक्य नाही असे प्रतिपादन केले आहे. यूरोपात या प्रश्नावर प्रारंभापासून दोन विचारप्रवाह अस्तित्वात आले आहेत. छंदाला वैकल्पिक मानणारा अरिस्टॉटल व कोलरिजसारख्या समीक्षकांचा एक विचारप्रवाह आणि छंद-संगीत कवितेचे आवश्यक माध्यम मानणारा ड्रायडन सारख्यांचा दुसरा विचारप्रवाह. माझे मत देखील छंदाच्या त्या जुन्या 'ग्राम्य-विशेषणांना' कवितेचे आवश्यक तत्त्व मानणाऱ्या पक्षात आहे. छंद कवितेचे सुलभ वाहन आहे. खरे पाहिल्यास प्रत्येक वाङ्मयाचे रूप आपल्या स्वतःच्या प्रकार-माध्यमातून प्रवाहित होते. नाटकात संवाद, कथा-वाङ्मयात वर्णनात्मक गद्य, समीक्षेत विवेचनात्मक गद्य, निबंधात ललित गद्य व कवितेत छंद. नाटकाच्या रंग-संकेतात वर्णनात्मक गद्याचा प्रयोग होतो, कादंबरीत संवादाचा, समीक्षेत ललित गद्याचा, निबंधात विश्लेषणात्मक गद्याचा व कवितेत लययुक्त गद्य-संगीताचा. असा प्रयोग काही कवींनी केला आहे. परंतु असे करणे सोपे नाही. येथे एक वाङ्मय प्रकार दुसऱ्या वाङ्मय प्रकाराची सीमा ओलांडून जातात. उदा० वास्तुकलेत मूर्तिकलेचा किंवा चित्रकलेचा संयोग दाखविणारे प्रयोग झाले आहेत, होत आहेत. वास्तविक सर्व कला व साहित्याचे मूलतत्त्व एकच आहे. रूप-प्रकार मात्र भिन्न. म्हणून त्यांची बाह्य उपकरणे बहुदा एक दुसऱ्यांच्या सीमांचे उल्लंघन करताना दिसतात. नाटकात आख्यान-तत्त्वांचा, कादंबरीत नाट्य-तत्त्वांचा, समीक्षांत लालित्याचा समावेश होऊन जातो. परंतु तरीदेखील त्याच्या मूळ वैशिष्ट्यात काही अंतर पडत नाही. याच प्रकाराने गद्य-वाङ्मयाची अनेक रूपे रसबाहुल्यामुळे काव्यात्मक झालेले आढळतात, व कवितेत देखील नाट्य-तत्त्वांचा समावेश झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. कविता समीक्षात्मक देखील असू शकते. आणि गद्यासारखी देखील. परंतु ते तिचे स्वाभाविक शुद्ध स्वरूप नव्हे. सांगण्याचे तात्पर्य एवढेच की नाटक, कादंबरी, निबंध इत्यादीप्रमाणे कविता देखील रसात्मक वाङ्मयाचा एक विशिष्ट प्रकार आहे. मूळ तत्त्व सर्वात एकच – रस. परंतु माध्यमाच्या दृष्टीने त्यांच्यात परस्पर भेद दिसतात आणि त्यामुळेच त्यांची वैशिष्ट्ये सुरक्षित राहिली आहेत. कविता या वाङ्मय प्रकाराचे माध्यम छंद आहे. संस्कृत काव्यशास्त्रात 'काव्य' रस साहित्याचा पर्याय आहे. त्यात नाटक, कादंबरी इत्यादींचा समावेश होतो. आज काव्य आणि कवितेत अंतर निर्माण झाले आहे. काव्य, संपूर्ण रस-साहित्याचा किंवा पाश्चात्य समीक्षा-शास्त्राच्या व्याख्येनुसार 'सृजनात्मक' साहित्याचा पर्यायवाची आहे. कविता मात्र नाही, ते एक रूप आहे. छंद माध्यमामुळे इतरापासून भिन्न.

सारांश पूर्वी निवेदन केलेली तत्त्वे – रमणीय अनुभूती, उक्तिवैचित्र्य आणि छंद (अर्थात वर्ण-संगीत व लय-संगीत) कवितेसाठी आवश्यक आहे. वरीलपैकी कोणतेही तत्त्व म्हणजे कविता नव्हे. या तिघांच्या सुसंगतिमधून निर्माण होणारे एकात्मक रूप म्हणजे कविता होय. पहिली दोन तत्त्वे काव्य आणि रसाच्या दृष्टीने साहित्याची अविभाज्य अंगे आहेत. तिसरे तत्त्व अर्थात् छंदामुळेच कवितासाहित्याच्या अन्य प्रकारापासून अलग करता येते. सारांश, असे म्हणता येईल की कविता रसात्मक साहित्याच्या त्या प्रकाराचे नाव आहे ज्याचे माध्यम छंद आहे. येथे आणखी एका शंकेचे निरसन करणे उपयुक्त ठरेल. ती म्हणजे रसात्मक साहित्याची इतर रूपे आणि कविता या दोहोत केवळ माध्यमाचेच अंतर आहे काय ? अधिक स्पष्ट शब्दात सांगावयाचे म्हणजे– कादंबरी आणि प्रबंध-काव्य यात एक गद्यात लिहिले आहे व दुसरे छंदबद्ध रचनेत एवढाच फरक समजावयाचा काय? दोघात भाव-तत्त्व नि मूळ संवेदानाच्या दृष्टीने काही अंतर आहे काय ? अनेक समीक्षक दोघात मूळ संवेदनेच्या दृष्टीने फरक मानतात. त्यांच्या मते कादंबरीचा आस्वाद आणि प्रबंधकाव्याचा आस्वाद भिन्न आहे. या मतात एवढेच तथ्य आहे की आस्वादाच्या

स्वरूपावर माध्यमाचा देखील परिणाम होतो. उदा. रानात उमललेला गुलाब आणि कोणी सुसज्जित केलेल्या पुष्पवाटिकेत उमललेला गुलाब दोघां-पासून होणाऱ्या सौंदर्यानुभूतीमध्ये थोडा फरक रहाणारच. हे पण निर्विवाद आहे की रसात्मकतेच्या उत्कटतेमुळे कविता स्वाभाविकपणे छंदाच्या माध्यमातून स्फुरण पावते आणि छंद -संगीत तिच्या रसात्मकपणाला अधिकच समृद्ध बनवते. या दृष्टीने आस्वाद आणि मूळ संवेदना यात देखील थोडे अंतर मानणे असंगत होणार नाही. परंतु हे अंतर प्रमाणाचे असेल. मूल-भूत स्वभावाचे असणार नाही. म्हणून मी पुन्हा माझ्या मताची पुनरावृत्ती करतो की कविता रसात्मक साहित्याच्या त्या प्रकारे नाव आहे ज्याचे माध्यम छंद आहे.

शेवटी एका महत्त्वाच्या प्रश्नाविषयी विवेचन करून माझे वक्तव्य संपवितो. मनोविज्ञानाच्या वाढत्या प्रभावामुळे काव्यशास्त्र समीक्षकांनी असे मत मांडले आहे की कविता ही एक अनुभूती आहे किंवा अनुभूतीचे एकात्मक रूप. आधुनिक मत आहे की कविता अनुभूतींचा एक वर्ग आहे. पूर्वीच दिलेल्या तुलसीदासाच्या पदावलीचा आधार घेऊन असे म्हणता येईल की – स्याम गौर किमि कहहुँ बखानी। गिरा अनयन नयन बिनु बानी ॥ कविता नाही परंतु त्यामुळे प्राप्त होणारी सहृदयात्मक अनुभूती ही कविता आहे. प्रश्न निश्चितच गहन आहे परंतु व्यावहारिक दृष्टीने यात अडचण निर्माण होणारच. कदाचित् याचा कारणामुळे भारतीय आचार्य अत्यंत सोयिस्कर तात्त्विक सिद्धांताचा आधार असताना देखील या भानगडीत पडले नाहीत. त्यांच्या व्यावहारिक बुद्धीने सहृदयात्मक अनुभूतीला स्पष्ट शब्दात रस म्हटले आहे. आणि ही अनुभूती निर्माण करणाऱ्या शब्दांना कविता. तात्त्विक दृष्टीने कदाचित रिचर्ड्सचे मत बरोबर असेल परंतु व्यावहारिक दृष्टीने म्हणजेच जाणणे किंवा जाणीव करून देणे यादृष्टीने आमच्या आचार्यांचेच मत ग्राह्य ठरते. 'शब्दार्थौ काव्यम्' अशा प्रकारे मी फिरून फिरून पहिल्याच पदावर आलो. रसात्मक शब्दार्थही काव्य आहे आणि त्याचा विशिष्ट छंदमय प्रकार आधुनिक अर्थाने कविता आहे.

प्रा. वा. गो. परांजपे

# भारतातील लिपिशिक्षणाची स्थित्यंतरे

## ‘सिद्धम्’ पासून ‘ग म भ न’

### उपोद्घात

भारतीय शिक्षणाचा इतिहास, भारतीय धार्मिक कल्पनांचा इतिहास आणि भारतीय राजकीय इतिहास हे कसे निगडित झाले आहेत आणि आमची प्रगति होत आहे किंवा दुसरे काही होत आहे ह्याचे वर शीर्षकात दिलेले प्राथमिक शिक्षणाचे आरंभस्थान असलेले शब्द निदर्शक होतील अशी माझी कल्पना आहे.

### दोन पिढ्यांपूर्वी

पन्नास वर्षांपूर्वी मुलांना प्रथम श्रीगणेशाय नमः ओनामासीधं अशी दोन वाक्ये शिकवीत असत. त्यांपैकी ओनामासीधं हे नाहीसे झाले, पण श्री गणेशाय नमः अलीकडेपर्यंत तग धरून राहिले होते. त्याच्याजागी मुलांना सोपी अक्षरे शिकविण्याचा प्रघात पडला आहे. श्रीच्याऐवजी ग आला तर काय बिघडले ? असे कोणी म्हणतील. त्या गोष्टीचाही स्वतंत्रपणे विचार करावयाचा आहे. मुख्य गोष्ट येथे ऐतिहासिक वस्तुस्थिती कोणती आहे ती पाहण्याची आहे. आणि त्या अनुषंगाने काही सूचनाही करावयाच्या आहेत.

### सिद्धम्

पतञ्जलीच्या महाभाष्यात पाणिनीच्या पू. ४००) अष्टाध्यायीवरील कात्यायन मुनीच्या ( ख्रि. पू. ३००). वार्तिकांवर टीका आहे. वार्तिकांचा आरंभ सिद्धे शब्दार्थ सम्बन्धे’, असा आहे आणि त्यातील सिद्ध शब्दाचा अर्थ नित्य असा पतञ्जलीने केला आहे. नित्य शब्दच का वापरला नाही ह्याचे उत्तर पतञ्जलीने असे दिले आहे की हा सिद्ध शब्द परंपरासिद्ध व मांगलिक आहे आणि जरी जुना झाला असला तरी कात्यायनाने तो मांगलिक म्हणून वापरला आहे. पतंजली आणखी असे म्हणतो की कात्यायनापूर्वीही व्याडीने आपल्या संग्रहाच्या आरंभी ( हा संग्रहग्रंथ आता लुप्त झाला आहे. ) सिद्ध शब्दच वापरला होता. त्यावरून एक अनुमान निघते की जुन्या काळी लहान मुलांना वर्णमाला शिकविताना आरंभी “सिद्धम्” हा शब्दच शिकवीत असले पाहिजेत. कारण भारतातून अगदी जुन्या काळी म्हणजे ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकात खोतानमार्गे आणि चौथ्या पाचव्या शतकात चिनी प्रवाशांनी आपली वर्णमाला चीनमध्ये नेली आणि तेथून जपानमध्ये गेली. त्या वर्णमालेचा तिकडे मुख्यतः ते लोक मांत्रिक उपयोग करू लागले[१] ह्या वर्णमालेला सिद्धम् म्हणत आणि ह्या सिद्धम् वर्णावर लिहिलेला ग्रंथ डॉ. रघुवीर ह्यांच्या विद्यमाने डॉ. लोकेशचंद्र यांनी प्रकाशित केला आहे. त्यात जपानमध्ये आजपर्यंत जपून ठेवलेल्या अत्यंत प्राचीन काळातील काही बौद्ध विद्वानांच्या हस्ताक्षरांचे नमुनेही आले आहेत. श्री. सिल्व्हँ लेव्हींनीही आमच्या अक्षरांचे चिनी मांत्रिक वाङ्मयात “अरपचन’ नामक लिपीत जे रूपांतर झाले त्यावर एक लेख लिहिला आहे त्यातही फार मनोरंजक माहिती आहे.[२] जुन्या जैन पोथ्यात आरंभी सिद्धम् हा शब्द आढळतो. पुढल्याकाळी कदाचित् सिद्धम् शब्दाचा हा जुना अर्थ व इतिहास माहीत नसल्याकारणाने मागे नमः जोडून त्याचे मंगलार्थक

---

१. ‘Siddham’ an easy on the history of Sanskrit studies in China and Japan- by R. H. Gutik, Nagpur- 1956.

२. पहा Y. S. A. हा लेख मूळच्या बटेव्हिया अकादमीने आपल्या नियतकालिकात छापलेला आणि Memorial Sylvain, Levi, Paris, 1937 मध्ये पुनर्मुदित.



अनुक्रमणिका

वाक्य केले. त्यानंतरच्या काळात ॐ हे जोडण्यात आले आणि अशा तऱ्हेने "ॐ नमः सिद्धम्" हे वाक्य बनले. त्याचे रूपांतर (ओनामासीधम्) होऊन त्यापैकी "ओनामा" हा शब्द अद्यापि "श्री गणेशा" प्रमाणे आरंभवाचक झाला आहे.

### श्रीगणेशा

मूळचा गणपति हा ब्रह्मणस्पति आहे. इंद्रालासुद्धा एकदा गणपति हे विशेषण ऋग्वेदात दिले आहे. त्याचा चालू गणेशाशी काही संबंध नाही. गृह्य व धर्मसूत्रात गणेशपूजा नाही. गणपतीसंबंधाने म. म. काणे यांच्या हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासाच्या दुसऱ्या भागाच्या पहिल्या खंडात पृष्ठ २१३-२१५ पर्यंत गणपति पूजनाविषयी मजकूर आला आहे तो अवश्य वाचनीय आहे; पण थोडक्यात सांगायचे म्हणजे गृह्यसूत्रात आणि धर्मसूत्रात गणपतीचा उल्लेख नाही. याज्ञवल्क्यस्मृतीत त्याचा विघ्नकर्ता विनायकात अंतर्भाव आहे; कालिदासाच्या ग्रंथात गणेशाचा उल्लेख नाही. त्याच्या पुढील काळात म्हणजे खिस्तोत्तर पाचव्या शतकानंतर मूळचा विघ्नकर्ता गणपति केव्हा तरी शिवपार्वतीचा मुलगा होऊन विघ्नहर्ता म्हणून सर्व कार्यांच्या प्रारंभी त्याची पूजा होऊ लागली. त्यामुळे बालशिक्षणातसुद्धा त्याला अग्रपूजेचा मान मिळाला.

### आधुनिक शिक्षणपद्धती

हा जुना इतिहास झाला. आधुनिक इतिहासात मुलांना श्री सारखे कठीण अक्षर न शिकविता सोप्या अक्षरापासून सुरवात करावी म्हणून "ग"ने ने प्रारंभ केला आणि त्याच्याप्रमाणे दुसरे सोपे वर्ण म्हणून म, भ, न असा क्रम लावण्यात आला. वर्णांची लिपी ही गोष्ट आणि भाषेतील वर्णमाला ही तिच्यापेक्षा फार भिन्न गोष्ट आहे. व्याकरण शास्त्राच्या आणि उच्चारशास्त्राच्या ह्या आमच्या अत्यंत प्राचीन जन्मभूमीत ह्या दोन्ही शास्त्रांचा अभ्यास शाळातून स्थगित केला आहे. ह्याचे कारण शिक्षणखाते असंस्कृत तज्ञांच्या हाती गेले आहे. प्रस्तुत लेखकाला एक वर्ष प्राथमिक ट्रेनिंग कॉलेजमध्ये शिक्षकाचे काम करण्याची संधी मिळाली आणि त्यामुळे तो असे सांगू शकतो की आपल्या वर्णमालेचा चोवीसशे किंवा अधिक वर्षांपूर्वी व्याकरण आणि प्रातिशाख्य नामक ग्रंथात जो क्रम लावून दिलेला आहे आणि ज्या क्रमाने अलिकडेपर्यंत वर्णमाला शिकविण्यात येत असे तो क्रम निदान शेकडा पन्नास "गुरुजींना" माहीत नसतो. त्याचप्रमाणे ह्या वर्णमालेचे शास्त्रीय तत्त्व त्यांनाच काय पण शिक्षणक्षेत्रातील वरच्या अधिकाऱ्यांनाही माहीत नसावे. सर्व जगातील वर्णमालांमध्ये अत्यंत शास्त्रीय म्हणून भाषाशास्त्रज्ञांनी मान्य केलेल्या आमच्या वर्णमालेची आमच्या देशातच विटंबना व्हावी आणि आमच्या मुलांना ह्या वर्णमालेचा शास्त्रशुद्ध क्रम माहीत नसावा हे फार खेदजनक आहे.

### अज्ञानमूलक

वर्णमालेच्या क्रमाकडे दुर्लक्ष होते ह्याचे कारण त्या वर्णमालेत काही शास्त्रीय तत्त्व आहे हे माहीत नसते. हे शास्त्र प्राथमिक शिक्षकांनाच काय, पण लहान मुलांनाही शिकविणे सोपे आहे. पूर्वीच्या व्याकरणातील स्थान विचार हा एक उच्चारशास्त्राचा प्राथमिक भाग आहे आणि लहान मुलांना त्याचे एका तासात आकलन होते ह्याचे मी पुणे येथील ट्रेनिंग कॉलेजात आणि बोर्डी येथे निदर्शन केले होते. मातृभाषा शिकताना आणि शिकविताना थोड्यातरी उच्चारशास्त्राची आवश्यकता आहे हे मी शिक्षणाधिकाऱ्यांच्या नजरेस आणू इच्छितो. अलिकडील "गुरुजीं"च्यापैकी खेड्यातील निदान साठ टक्के लोकांना 'ङ' चा उच्चार करिता येत नाही. च, ज, (दन्त्य) आणि च, ज (तालव्य) यांच्या उच्चारात गोंधळ होतो. श आणि ष यांच्या उच्चारातील फरक माहीत नसतो. 'सी' ची 'शी' होते. बाकीच्या संस्काराआधी जिव्हासंस्कार व्हावयास पाहिजेत आणि शिक्षणक्रमात प्राथमिक उच्चारशास्त्राचा समावेश व्हावयास पाहिजे. तरच मागासलेल्या वर्गांच्या संस्कृतीचा खरा पाया घातला असे होईल. हा व्याकरणाशास्त्राचा भाग अगदी आरंभी म्हणजे तिसऱ्या इयत्तेतसुद्धा शिकविता येईल, हे प्रयोगाने पडताळून पहावे; मी पाहिले आहे.



अनुक्रमणिका

### अशास्त्रीय अंधानुकरण

जुन्या अघोष आणि घोष यांच्याऐवजी अलिकडे कठोर आणि कोमल या संज्ञा वापरतात त्या अशास्त्रीय आहेत. जुने शास्त्र जर शिल्लक ठेवायचे तर जुन्या संज्ञा शिल्लक ठेवणे इष्ट आहे. पण नवीन संज्ञांविषयी, नवीन शुद्धलेखनाविषयी आणि नवीन पदनामकोशाविषयी काहींहि बोलू नये हेच योग्य म्हणून येथेच हे विवेचन थांबवितो.

आमच्या शिक्षणक्षेत्रात काय गंमती होतात हे सांगण्यालायक आहे.

इंग्रजी वर्णमाला अशास्त्रीय आहे आणि तिच्यातील स्वरांचे उच्चार अनिश्चित असतात म्हणून लिपी व्यष्टिरूपाने न शिकवता समष्टि-रूपाने शिकविण्याची एक नवीन प्रथा इंग्रजी शिक्षकांनी काढली आहे. Put, But, Buy, Bury अशा शब्दांमध्ये आधी अक्षरांचे उच्चार-ज्ञान आणि मग शब्दांचा उच्चार असे करणे इंग्रजी वर्णमालेच्या अशास्त्रीयत्वामुळे बाल-शिक्षणाच्या आरंभीच्या अवस्थेमध्ये गैरसोईचे वाटणे साहजिक आहे. आणि अवयवज्ञाना-व्यतिरिक्त अवयवांचे (समुदायांचे) ज्ञान होणे शक्य आहे, ह्या न्यायानेही अक्षरांव्यतिरिक्त संपूर्ण शब्द वाचण्याची पद्धती त्यांनी उचललेली असावी. आमची वर्णमाला शास्त्रीय असल्यामुळे त्या पद्धतीचे अनुकरण आम्ही करणे हास्यास्पद आहे, पण आपल्या वर्णमालेचे शास्त्रीयत्व माहीत नसल्यामुळे हे अंधानुकरण काही वर्षांपूर्वी सातारा जिल्ह्यात काहीं काळ चालू होते हे मी प्रत्यक्ष अनुभवाने सांगतो.

### श्री किंवा ग

आता प्रारंभी निर्देश केलेल्या, आधी श्री शिकवावी किंवा ग शिकवावा ह्या विषयाकडे वळू. मी पुराणसंस्कृतीचा अभिमानी असलो तरी ऐतिहासिक सत्य आणि व्यवहार ह्यांच्याकडे लक्ष दिलेच पाहिजे. मला जसा ओंकाराचा किंवा गणेशाचा अभिमान नाही तसा श्री चाही नाही. पण ह्याविषयी जो विचार केला आणि जे प्रयोग केले त्यावरून प्रथमारंभीं शिकविण्याला श्री हे अक्षर उपयुक्त आहे आणि ग हे अक्षर अयोग्य आहे असे वाटते त्याचे कारण असे :

मुलांच्या हाताचे आणि बोटांचे स्नायू तयार होईपर्यंत त्यांना प्रत्यक्ष लिहिण्याचे काम सांगू नये, तर त्यांच्या डोळ्यांना रेखाज्ञान होईल अशा तऱ्हेने रेघांचीच माहिती द्यावी. उभी रेघ, आडवी रेघ, वाटोळी रेघ, लहान पूज्य, मोठे वर्तुळ, अर्धं वर्तुळ असे रेखाज्ञान होण्याकरिता जाड पुष्टिपत्राचे किंवा पातळ पत्र्याचे रेखाकार तुकडे करून ते त्यांना जुळवावयास सांगावेत. ते जुळवून त्यांच्याकडून बरीचशी अक्षरे करून घेता येतात. त्यादृष्टीने श्री हे कठीण अक्षरच रेखाज्ञानानला फार उपयुक्त आहे आणि अगदी लहान मुलांना पहिल्याच दिवशी डोळ्याने व कृतीने हे अक्षर शिकविता येते. प्रयोग करून पहावा. उलटपक्षी, लिहावयास शिकविताना न, म, भ असा क्रम बरा आणि ग पुढे केव्हा तरी यावयास पाहिजे. कारण ग मध्ये जो वर्तुळाकार भाग आहे तो मोठ्या वर्तुळाचा एक लहान अंश असल्यामुळे पूर्ण वर्तुळ किंवा अर्धवर्तुळ यापेक्षा शिकविण्यास तो कठीण आहे. सरळ रेघेला जर खाली पोकळ पूज्य दिले तर तो ग चा खरा आकार नव्हे म्हणजे हे शिकविणे अशास्त्रीय होते. अशा तऱ्हेने 'ग' ची अग्रस्थानी योजना करण्यात फारसा सूक्ष्म विचार करण्यात आलेला दिसत नाही.

### वर्णांचे वर्गीकरण

उच्चारशास्त्रदृष्ट्या मराठी भाषेतील वर्णांचे वर्गीकरण हा अगदी स्वतंत्र विषय आहे. त्याचे विवेचन येथे अप्रस्तुत म्हणून केले नाही.

---

# लावणी वाङ्मयाचे प्रेरणास्थान –गाथा सप्तशती

श्री. अनंत फंदी

## प्रास्तविक

प्रणयभावना ही अगदी नैसर्गिक असून अनादि-कालापासून ती मानवाच्या स्वभावात आहे. जगात कोणत्याही देशात जा, प्रणयाची भावना मानवाचे एक व्यवच्छेदक लक्षण असल्याचे दिसून येईल. प्रणय-भावनेचे प्रकटीकरण काव्यद्वारे होणे हीही एक स्वाभाविक गोष्ट होय.

मानवी स्वभावात प्रणयाची भावना कधी नव्हती असे नाहीच. या भावनेचे मूळ शोधीत आपण मागे गेलो तर ऋग्वेदाच्या एखाद्या ऋचेत ती आढळेल. अश्वघोषासारख्या बौद्धभिक्षूच्या 'सौंदर्यानंदा' त सुंदरीच्या भावना रंगविलेल्या दिसतील. घटकर्पराच्या काव्यातही प्रणयभावनेला स्थान असल्याचे दिसून येईल.

"प्रणयभावनेच्या विकासाला इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकापूर्वीपासून वाव मिळू लागला असावा. कारण पतंजलीच्या महाभाष्यात 'वासव-दत्ते' च्या प्रणयप्रधान कथेचा उल्लेख येतो. अश्वघोष बौद्धभिक्षू होता. त्याच्या काव्यात प्रणयाची अपेक्षा करता येत नाही. तथापि 'सौंदर्यानंदा' तील सुंदरीच्या भावना, धार्मिक विषयाला विरोधाने उत्कटता आणण्यासाठी का होईना, जिव्हाळ्याने रंगविल्या आहेत." असे डॉ. करंबेळकरांनी म्हटले आहे.

इसवी सनाच्या प्रारंभीच्या संस्कृत काव्यात प्रणयभावनेचा विकास झालेला दिसत नसला तरी प्राकृत काव्यात मात्र ही भावना विकसित स्वरूपात आढळून येते. इतकेच नव्हे तर प्राकृत स्फुट काव्याचा प्रणय हाच मुख्य विषय असल्याचे दिसते.

डॉ. करंबेळकर स्पष्टपणे म्हणतात, "इसवी सनारंभी प्रणयभावना काव्य स्वरूपात पूर्णपणे विकास पावली नव्हती. शिष्टसंमत संस्कृत काव्यात जरी नाही तरी ग्रामीण अंतःकरण स्पष्टपणे प्रतिबिंबित करणाऱ्या प्राकृत काव्यात मात्र ती भावना चांगलीच विकसित झाली होती. प्रणय हाच प्राकृत स्फुट काव्याचा प्रधान विषय आहे." (डॉ. करंबेळकर :– "संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास" प्रकरण २६ वे 'लघुकाव्य')

## प्राकृत काव्य

याची सत्यता अजमावण्याकरिता प्राकृत भाषे-मधील काव्याची पहाणी करणे योग्य होईल. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे हालराजाने संगृहीत केलेला 'गाथा सप्तशती' हा महाराष्ट्री प्राकृत भाषेतील काव्यसंग्रह होय. महाराष्ट्रात लिहिल्या गेलेल्या व महाराष्ट्री प्राकृतातल्या या आद्य ग्रंथाला "कालानुक्रमे आद्य व गुणमानाने अग्रगण्य" असे श्री. स. आ. जोगळेकर यांनी म्हटले आहे.

"गाथा सप्तशती हे भारताचे आद्य लौकिक लोकवाङ्मय आहे आणि महाराष्ट्राचे आद्य अभिमानस्थान आहे" असा या ग्रंथाचा गौरव करून ते पुढे म्हणतात,

"अहंमन्य व स्वसंतुष्ट संस्कृतनिष्ठ पंडितांनी मराठीची अवहेलना मांडलेली असली तरी माझ्या मुखातून सशब्द होणारी मराठी वचने ही अमृताते जिंकतील ही ज्ञानेश्वरांची प्रतिज्ञा आणि गाथा सप्तशतीतील प्राकृत काव्याच्या अमृत-मधुरत्वाची ग्वाही यांची तुलना करण्यासारखी आहे. ज्ञानेश्वरांनी ज्ञानाभोवती पंडितांनी उभार-लेली कोंडी फोडली आणि गाथा सप्तशतीने काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत हिंदुस्थान जिंकले. बाणभट्टासारख्या महापंडिताचे उद्‌गार आणि अलंकार वाङ्मयात समाविष्ट झालेली गाथा सप्तशतीतील असंख्य वचने ही या विधानाला साक्षी आहेत". (श्री. सदाशिव आत्माराम जोगळेकर :– "हाल सातवाहनाची गाथा सप्तशती)

अशा या प्रसिद्ध श्रेष्ठ प्राकृत काव्यग्रंथाचे परीक्षण करून मराठी लावणी वाङ्मयाचे ते प्रेरणास्थान असावे की काय हे पहाणे मनोरंजक व उद्‌बोधक ठरेल.

## गाथा सप्तशती

गाथा सप्तशती हे मुक्तक काव्याचे संकलन आहे. अग्निपुराणात (३३७-३३ पृ. ४२१) 'चमत्कारक्षम एक श्लोक म्हणजे मुक्तक' असे म्हटले आहे.

"पूर्वीच्या कोणत्याही प्रसंगाशिवायच मुक्तकाचे रसास्वादन केले जाते." असे आनंदवर्धन याने सांगितले आहे. (ध्वन्यालोक ३, पृ. १४३-१४४). "स्वयंपूर्ण, अन्यनिरपेक्ष अशी विशिष्ट छंदातील रचना म्हणजे मुक्तक" असे संस्कृतातील सर्व आचार्यांनी म्हटले आहे.

मुक्तक काव्यात कथाप्रवाह नसतो व त्यातील प्रत्येक पद्य स्वयंपूर्ण व समर्थ असते. मुक्तकाचा कवी वेचक शब्दात आपले भाव मंत्रमुग्ध करणाऱ्या चमत्कृतिपूर्ण भाषेमध्ये अभिव्यक्त करतो. मात्र ते भाव समजण्यासाठी वाचकांच्या अंगी थोड्या प्रतिभेची आवश्यकता असते. प्राकृतात प्रेम, शृंगार, धर्म, नीती व वीररससंबंधी एकापेक्षा एक सरस मुक्तकांची रचना झाली आहे.

मुक्तक पद्यांच्या रचनेला मुक्तककोश असे म्हणतात. गाथा सप्तशती हा मुक्तक कोश होय.

मुक्तक काव्याची प्रेम व शृंगाररसप्रधान नवीन परंपरा हालाच्या गाथा सप्तशतीपासून सुरू होते. हाल हा प्रतिष्ठान (हल्लीचे पैठण) येथील राजा. इसवी सनाचे प्रथम शतक हा त्याचा काल मानला जातो. हालाने एक कोटी गाथांमधून सातशे सर्वश्रेष्ठ गाथा निवडून हा गाथा सप्तशती मुक्तककोश संकलित केला आहे. यावरून प्राकृत कालात मुक्तक काव्यरचना किती विपुल प्रमाणात होत असली पाहिजे हे दिसून येते.

गाथा सप्तशती या काव्यसंग्रहात चार ओळींची एकेक गाथा आहे. अशा एकूण सातशे गाथा असल्यामुळे या ग्रंथाला गाथा सप्तशती असे म्हणतात. शातवाहन वंशातील हालराजाच्या नावावर हा ग्रंथ असला तरी तो अनेक कविविरचित आहे. शातवाहन वंशीय राजे इसवी सनाच्या प्रारंभी राज्य करीत होते. म्हणून हा ग्रंथ त्याच कालात निर्माण झाला असे मानावे लागेल.

गाथा सप्तशतीमधील मुख्य विषय प्रणय हा आहे. त्यामुळे त्यास प्रणयकाव्य म्हणता येईल. एकाच विशिष्ट प्रणयभावनेचे मनोरम व रेखीव चित्र एकेका गाथेत रेखाटण्याचे कसब करून दाखविण्याचे अवघड कार्य या कवींनी यशस्वीरीत्या केले आहे. प्रणयभावनेच्या अंगोपांगांचे वैविध्य व वैपुल्य सौंदर्यदृष्टी ठेवून प्रभावीपणे आविष्कृत करण्यात या प्राकृत कवींनी आपले आगळेपण प्रस्थापित केले आहे.

गाथा सप्तशतीत वर्णिलेली संस्कृति नागर नसून ती ग्रामीण अथवा जानपद आहे; अशिक्षितांची आहे.

प्रसिद्ध संस्कृत पंडित बाणभट्ट याने हर्षचरिताच्या प्रारंभी 'सप्तशती' ची प्रशंसा केली आहे. या प्राकृत सप्तशतीची लोकप्रियता इतकी वाढली की त्यानंतरच्या अनेक संस्कृत कवींनी तिचे अनुकरण केले आहे.

'अमरु शतक' हा गाथासप्तशतीसारखा संस्कृत ग्रंथ आहे. 'आर्या सप्तशती' हा संस्कृत काव्यग्रंथ गोवर्धन कवीने गाथासत्पशतीचे अनुकरण करून रचला आहे. यावरून गाथा सप्तशतीच्या प्रभावाची सहज कल्पना येते.

प्रणयभावनांचा सर्वांगीण आविष्कार अगदी प्रथम गाथा सत्पशतीत आढळतो व वैचित्र्य, नाविन्य आणि सौंदर्य ही या ग्रंथाची वैशिष्टये आहेत.

"भावनांची प्रसन्नता व ताजेपणा या दोन गुणांबद्दल हा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. प्रणयभावनांचा सर्वांगीण आविष्कार अगदी प्रथम याच संग्रहात आढळतो. निरनिराळे प्रसंग कल्पून प्रणयभावनेत किती अवस्था, भेद, बदल व प्रकार होऊ शकतात हे दिसून येते." असा अभिप्राय व्यक्त करून डॉ. करंवेळकरांनी या

ग्रंथाची पुढील वैशिष्टये सांगितली आहेत. ते म्हणतात,

"साधेपणा, निष्ठा व कल्पनांचे परस्पर-स्वातंत्र्य कायम ठेवून कवीने त्यात सूक्ष्म विरोध, सूक्ष्म क्रोध यांच्या छटा मोठ्या कौशल्याने रंगविल्या आहेत. वैचित्र्य, नाविन्य व सौंदर्य ही या ग्रंथाची वैशिष्टये आहेत." (डॉ. करंबेळकर, 'संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास' प्रकरण २६ – 'लघुकाव्य')

डॉ. केतकर यांनी आपल्या 'प्राचीन महा-राष्ट्र – विभाग दुसरा' या ग्रंथात संपूर्ण गाथा सप्तशती दिली आहे.

गाथा सप्तशतीमधील काही गाथा वानगी-दाखल पुढे उद्धृत करीत आहे. त्यावरून मराठी लावण्यांना पूर्वगामी म्हणून या गाथा कितपत ठरतील याचा अंदाज करता येईल.

(१) 'किं किं दे पडिहासइ ? सहीहिँ इअ पुच्छिआएँ मुद्धाए
पढमुग्गअदोहिँणीए णवरं दइअं गआ दिट्ठी ॥'

शतक १ ले, गाथा क्रमांक १५, कविनाम– गअसिंह – गजसिंह.

[अर्थ : प्रथमच डोहाळे लागलेल्या मुग्धेला तिच्या सखीने तुला काय काय आवडते असे विचारल्यावर तिची दृष्टी केवळ आपल्या पतीकडे गेली.]

(२) 'अच्छेरं व णिहिं विअ, सग्गे रज्जंव अमअपाणं व
आसि म्हतं महूत्तं विणिअंसणदंसणं तीए ॥

शतक २ रे, गाथा क्रमांक २५.

[अर्थ : विवस्त्र स्थितीत तिच्या देहाचे दर्शन एक मुहूर्तभर जरी झाले तरी ते आश्चर्यकारक झाले व स्वर्गातील राज्य व अमृत यांचा मला लाभ झाला आणि मला एक ठेवा दिसला असे वाटले.]

(३) विरहे विसं व विसमा, अमअमआ होइ संगमे अहिअम्
किं विहिणा समअं विअ दोहिं वि पिआ विणिम्मिअआ ?'

शतक ३ रे, गाथा क्रमांक ३५.

[अर्थः– विरहामध्ये विषाप्रमाणे दुःसह आहे, तथापि संगमामध्ये (रतिसंगम) अमृताप्रमाणेच होते. खरोखरच विधीने विष आणि अमृत या दोहोंच्या साहाय्यानेच ही प्रिया निर्माण केली आहे काय ? ]

(४) 'अज्जाइ णील कंचुअभरिउव्वरिअं विहाइ थणवट्टम्
जलभरिअजलहरन्तरदरुग्गअं चंद्रविम्वव्व॥'

शतक ४ थे, गाथा क्रमांक ९५

[अर्थ :– नील कंचुकीने झाकून उरलेले आर्येचे स्तनपृष्ठ जसे पाण्याने भरलेले मेघ असताना त्यातून चंद्रबिंब बाहेर पडावे तसे दिसते.]

(५) "रइविरमलज्जिआओ अप्पत्तणि अंसणाणोँ सहसव्व
ढक्कन्ति पिअअमालिंगनणेण जहणं कुलवहूओ ॥'

शतक ५ वे, गाथा क्रमांक ५९

[अर्थ :–रतिसौख्य संपल्यावर लज्जित झालेल्या व ज्यांना वस्त्र सापडले नाही अशा कुलवधू आपल्या प्रियकराच्या आलिंगनाने झटदिशी आपले जघन आच्छादित करतात.]

(६) 'पत्तणिअम्बफ्फंसा ण्हाणुत्तिण्णाएँ सामलंगीए
जलबिन्दुएहिँ चिहुरा रुअन्ति बन्धस्स व भएण ॥'

शतक ६ वे, गाथा क्रमांक ५५.

(अर्थ :– ती शामलांगी स्नान करून उठल्यावर तिच्या नितंबाचे स्पर्शसुख ज्यांनी अनुभविले आहे असे केस पुन्हा बांधले जाण्याच्या भीतीने आपल्या जलबिन्दूनी जणू काय रडतच आहेत.)

(७) 'दो अंगुल अकवाल अपिणद्धसविसेसणील कंचुइआ
दावेइ थणेत्थलवण्णिअं व तरुणी जुअजणाणम् ॥'

शतक ७ वे, गाथा क्रमांक २०.

[ अर्थः– दोन अंगुली इतक्या मापाच्या ठुशांनी जिची गाठ बांधली जात आहे अशी निळ्या रंगाची कंचुकी घालून आपल्या विशेष नील अशा कंचुकिका दाखवीत ती तरुणी तरुणजनांना जणु काय आपल्या स्तनस्थानाचा रंगच दाखवीत आहे. ]

गाथा सप्तशतीत काही कवयित्र्याही आहेत. अनुलच्छी, असुलद्धी, ओंदिसुंदरीए, माहवीये, पहईए, रेवाए इत्यादी कवयित्र्यांची काव्ये या संग्रहात समाविष्ट झाली आहेत. प्रत्येक शतकातील एक याप्रमाणे सात गाथा वर उद्धृत केल्या आहेत.

## गाथा सप्तशती – लौकिक लोकवाङ्मय

गाथा सप्तशतीतील गाथा संस्कृतातील सुभाषितांच्या रचनेसारख्या वाटतात. अथवा मराठीत स्फुट श्लोक म्हणून केशवसुतादिकांनी जी कविता रचली तशासारख्या वाटतात. अगर 'कणिका' नामक आधुनिक मराठीत जो काव्यप्रकार आहे त्याची आठवण या गाथा करून देतील. अर्थात् कणिका पाच ओळींची असते. व या पाच ओळी 'भूपति' किंवा 'लीलारति' या जातीच्या असतात. पहिल्या दोन व शेवटच्या दोन ओळीत यमक असते. एखाद्या विषयासंबंधीच्या रूढ विचारपद्धतीस एकदम कलाटणी देऊन कणिका परिणामकारक झालेली असते. ही कलाटणी चमत्कृती निर्माण करून रसिकाला विस्मय वाटण्यात कणिकेचे पर्यवसान होते. तिसऱ्या ओळीत कलाटणीला आरंभ होतो.

सप्तशतीतील 'गाथा' व मराठीतील 'कणिका' यामध्ये अल्पविस्तार सोडून दिला तर काही फारसे साम्य दिसत नाही. जपानी भाषेतील 'टांका' या काव्यप्रकारावरून रविन्द्रनाथ टागोर यांनी हा प्रकार प्रथम बंगालीत आणला व श्री. गोपीनाथ तळवळकर यांनी तो मराठीत प्रथम आणला. 'गाथे' वरून 'कणिका' आली असे मुळीच नाही. मराठीतील 'स्फुट श्लोक' चार ओळींचे असले तरी त्यांचा विषय सहसा 'प्रणय' हा दिसत नाही. संस्कृतातील सुभाषितांचे वैशिष्ट्य वेगळेच आहे. एवंच 'गाथा' यांचे साम्य संस्कृत सुभाषिते, मराठी स्फुट श्लोक वा 'कणिका' यांच्याशी नाही. 'अल्पसा विस्तार' हाच साम्याचा भाग दिसतो.

एवढ्याशा अल्पविस्तारात भावनेच्या परिपोषास कितीसा वाव मिळणार ? तरीही 'गाथां' मधून हा परिपोष आकर्षक रीतीने थोड्या प्रमाणात का होईना झालेला दिसतो.

गाथांमधील वर्णिलेले जीवन ग्रामीण दिसते. ग्रामीण स्त्रीपुरुषांचा साधाभोळा स्वभाव व त्यांचा निर्व्याज प्रणय गाथांमधून प्रकट झाला आहे. गाथांमधील वास्तवता व निर्मळ ग्रामीण संस्कृती मनाची झटकन पकड घेते. गाथांमधील मुख्य विषय 'प्रणय' आहे. काही गाथांमधून वत्सलरसही आढळतो. प्रत्येक गाथा म्हणजे एक विशिष्ट प्रणयभावनेचे चित्र आहे.

वर उद्धृत केलेल्या गाथांखेरीज गाथा सप्तशतीत आणखी पुढील विषय आलेले आहेत. दोन सवती, माळिणीवर प्रेम करणारा तरुण, तिला फुलांच्या मालेची किंमत विचारणारा प्रेमी, अनेक फुलांचा रस चाखण्याची इच्छा होणे हा भ्रमराचा दोष नसून फुलांचा दोष होय असे म्हणणारा प्रेमवीर, वृश्चिक दंश झाल्याच्या मिषाने वैद्याला भेटणारी युवती, रस्ता माहीत असूनही एका तरुण शेतकरी स्त्रीला मुद्दाम रस्ता विचारणारा तरुण, पुत्र अकस्मात् जागा झाल्यामुळे विस्कटून गेलेला शृंगार इत्यादी अनेक प्रकार या गाथांमधून चित्रित झाले आहेत. तथापि प्रमुख विषय 'प्रणय' हाच दिसून येतो. शृंगारालाच राजपद दिलेले आढळते. गाथांमधील ग्रामीण समाज मोकळा, स्वतंत्र, हौशी, उघड्या मनाचा व साधाभोळा दिसतो.

गाथा सप्तशतीचे वाचन केले असता तीत समाजाचे अंतःकरण प्रकट झालेले दिसते. गाथांमधील भावना उत्स्फूर्त आहेत व त्या अकृत्रिमपणाने रेखाटलेल्या आहेत. म्हणूनच श्री. स. आ. जोगळेकर यांनी गाथा सप्तशती हे भारताचे "लौकिक लोकसाहित्य" आहे असे आवर्जून म्हटले आहे.

लोकसाहित्य हे बहुजन समाजातील कवींनी बहुजनसमाजासाठी निर्माण केलेले व बहुजन समाजाच्या भाषेत लिहिलेले असते. त्यात बहुजन समाजाचे जीवन चित्रित केलेले असते. या दृष्टीने पाहिले असता गाथा सप्तशतीत काही गाथा स्वतः हाल राजाने रचलेल्या असल्या तरी इतर बहुसंख्य कवी बहुजन समाजातील आहेत. हालाच्या स्वरचित गाथांमुळेही बहुजनसमाजाच्या जीवन-चित्रणाला बाध येत नाही. यामुळे गाथा सप्त-शतीची गणना हमखास लोकसाहित्यात करावी लागते. इतकेच नव्हे तर हे अव्वल दर्जाचे लोक-साहित्य आहे असेच दिसून येते.

"शिष्ट साहित्य हें संस्कृतीशी एकनिष्ठ असते पण बहुजन समाजाच्या व्यावहारिक जीवनाशी एकरूप नसते. लोकवाङमय हे संस्कृ-तीशी एकनिष्ठ असते आणि जनतेशी एकरूप असते. या दृष्टीने पाहता गाथा सप्तशती हे अव्वल दर्जाचे लोकसाहित्य आहे. संस्कृतीशी एकनिष्ठ व बहुजन समाजाच्या जीवनाशी एकरूप असे हे लोकवाङमय आहे असे दिसून येते." असा निर्वाळा श्री. स. आ. जोगळेकरांनी दिला आहे. (श्री. स. आ. जोगळेकर : "हाल सात-वाहनाची गाथा सप्तशती")

## लावणी वाङ्मयाचे प्रेरणास्थान

या गाथांचे नाटचाशी साम्य दिसते, कारण अनेक गाथांमध्ये नाटचवस्तू आहेत. प्रारंभी नांदी व शेवटी भरतवाक्यही आहे. त्यामुळे या गाथा ही आंकणकडवी असावीत व त्यांच्या अनुरोधाने त्यावेळी ग्रामीण नाटच रंगविले जात असावे असेही अनुमान श्री. जोगळेकरांनी काढले आहे.

गाथा सप्तशतीची आरंभीची मांडणी नाटका-सारखी दिसते. आरंभी नांदी व अखेरीस भरत-वाक्य आहे. हाल राजा हाच सूत्रधार दिसतो. अनेक गाथांमध्ये नाटचवस्तू आहेत. कित्येक गाथात आख्यानांचे उल्लेख आहेत. अनेक गाथात प्रचलित लोककथांचा संदर्भ आढळतो.

लावणीचा किंवा पोवाडचाचा एक एक चौक संपला की रंगभूमीवरील सर्वजण मिळून ध्रुवपद घोळून म्हणतात; जणु एक एक प्रवेश संपल्यावर तोवरच्या नाचगाण्यामुळे व हावभावांमुळे, गद्य व ग्राम्य वक्तव्यामुळे भांबावलेल्या श्रोत्यांना संदर्भाची आठवण करून देण्यासाठी. तशाच या गाथा ध्रुवपदासारख्या वारंवार म्हणण्यात येत असाव्यात असा श्री. जोगळेकरांचा तर्क आहे.

"हे मान्य झाले तर मराठी पोवाडा व लावणी यांचे मूळ आपल्याला गाथा सप्तशतीत सापडलेसे होईल." असे त्यांना वाटते.

(श्री. स. आ. जोगळेकर :– "हाल सातवाहनाची गाथा सप्तशती")

वरील गोष्टींचा साकल्याने विचार केला असता गाथा सप्तशती मराठी लावण्यांसारखीच वाटते. अर्थात् लावणीचा विस्तार गाथेइतका अल्प नसतो. जातिरचनाही भिन्न असते. तथापि शृंगार व तोही विशेषतः नागर नसून जानपद व कवनांच्या विषयांवरून या गाथा लावण्यांना पूर्वगामी वाटतात. मराठी लावणी, प्राकृत भाषीय गाथांमधून उत्क्रांत झाली असावी असे म्हणण्याचा मोह होतो.

डॉ. केतकरांनी हालाच्या या काव्यसंग्रहाला लावण्यांचा संग्रह असे स्पष्टपणे म्हटले आहे. मुकुंदराज व ज्ञानेश्वर हे मराठीतील आद्य ग्रंथकार खासच नाहीत. महानुभाव परंपरा ज्ञानेश्वरपूर्व आहेच. ज्ञानेश्वरीसारखा विकसित मराठी भाषिक ग्रंथ एकाएकी निर्माण होणे संभवनीय नाही. त्याआधी जैन व बौद्ध ग्रंथ-कारांनीही मराठीत रचना केली असली पाहिजे व मराठी भाषेचा विकास होऊन ती प्रगल्भ झाली असली पाहिजे. तथापि हे सर्व शिष्ट वाङ्मयाचेच उत्पादक आहेत. यांच्या अगोदर मराठीमध्ये कविता करणारांचा एक जुना वर्ग होताच असे डॉ. केतकर म्हणतात व त्यांच्या मते तो वर्ग म्हणजे लावण्या, पोवाडे करणारांचा होय. त्यांनी स्पष्टपणे प्रतिपादन केले आहे की, "लावण्यांची परंपरा शातवाहनांपासून सुरू झाली ती एकसारखी चालूच असली पाहिजे. हालाची सप्तशती हा एक संग्रह आहे. निरनिराळ्या

कवींच्या लावण्या त्यात एकत्र केलेल्या आहेत. आणि त्यावेळेसच ती लावणी म्हणणाऱ्यांची परंपरा स्थगित झाली होती असे दिसते." (डॉ. श्री. व्यं. केतकर :– "महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण" प्रकरण ५ वे "मराठी वाङ्मयाचा पहिला काल व कवींचे आपल्या अस्तित्वाचे समर्थन.")

लावण्यांची परंपरा शातवाहनांपासून सुरू होऊन ती एकसारखी अखंड चालूच असली पाहिजे असे म्हटल्यावर त्यापुढील बऱ्याच मोठ्या कालखंडातील लावण्या आढळत का नाहीत हा प्रश्न उभा राहतो. यावरही डॉ. केतकरांनी स्पष्टीकरण करून म्हटले आहे की या लावणीकारांचे काव्य तयार होऊन लोकांच्या मुखी व्हावयाचे आणि नंतर दुसऱ्यांचे काव्य लोकमुखी झाले म्हणजे पूर्वीचे काव्य विस्मृती पंथास जावयाचे असा प्रकार चालू होता.

प्राचीन मराठी लोकवाङ्मय अनुपलब्ध का असावे याचे डॉ. केतकरांनी दिलेले हे कारण सहज पटण्यासारखे आहे. मराठी लावण्या व पोवाडे यांची परंपरा किती प्राचीन असली पाहिजे यावर आतापर्यंतच्या विस्तृत विवेचनावरून चांगला प्रकाश पडला आहे.

प्राचीन मराठीच्या कालात शिष्टवाङ्मय संस्कृतात लिहिले जाई, व लोकरंजन करणारे वाङ्मय मराठीत रचले जात असे. शिष्टवाङ्मयही संस्कृतात न लिहिता मराठीत लिहिण्याचा पायंडा मुकुंदराज, ज्ञानेश्वर व महानुभाव पंथीय कवींनी पाडला. यावर डॉ. केतकर म्हणतात:

"ज्ञानेश्वरपूर्व कालात लोकांची वृत्ती झाली होती ती अशी :– महत्त्वाच्या विषयावर संस्कृतमध्ये लिहावे व केवळ सामान्य लोकरंजनार्थ जे लिहिणे असेल तेवढेच मराठीत लिहावे. मुकुंदराज, ज्ञानेश्वरांनी जे कार्य केले ते प्रतिष्ठित ग्रंथरचनेस मराठीत सुरुवात केली हे होय. ते दोघेजण सामाजिक दृष्टीने लावण्या रचणाऱ्या वर्गातील नसून सुशिक्षित मंडळीत मोडत होते. त्यांनी देश्य वाङ्मयाच्या बाजूला वळून निराळाच वाङ्मयसंप्रदाय उत्पन्न केला." (डॉ. केतकर : "महाराष्ट्रीयांचे काव्य परीक्षण" प्रकरण पाचवे. 'मराठी वाङ्मयाचा पहिला काल व कवींचे आपल्या अस्तित्वाचे समर्थन')

ज्ञानेश्वरपूर्वकालात लावण्या व पोवाडेसदृश काव्य रचले जात होते यात शंका नाही. लावण्यांची परंपरा गाथा सप्तशती पर्यंत जाते हे स्पष्ट दिसते. किंबहुना 'गाथा' या एक प्रकारच्या लावण्याच होत व लावणी वाङ्मयाचे प्रेरणास्थान 'गाथा सप्तशती' हे असावे असे अनुमान करायला प्रत्यवाय दिसत नाही.

## वाचकांचा पत्रव्यवहार –

श्री. संपादक, "नवभारत" यांना

"नवभारत" च्या नोव्हेंबर १९६७ च्या अंकात श्री. बा. ना. देशपांडे यांचा तुकोबांच्या निर्याणावर लेख आलेला आहे; या लेखातील त्यांच्या विचाराबाबत तो स्वतंत्र विषय असल्याने त्याची चर्चा प्रस्तुत करीत नाही. तर सदर लेखात बहिणाबाईच्या अभंगाचा उल्लेख आहे त्याबद्दल काही खुलासा करणे जरूर असल्याने करीत आहे.

श्री. देशपांडे यांनी बहिणाबाईचा "आनंद-वोवरी होती तये ठायी" हा अभंग संपूर्ण उद्धृत करून त्यातील तिसरी ओळ पुढीलप्रमाणे दिली आहे.

**तुकारामा तंव देखतां देखत ।**
**आले अकस्मात मृत्युरूप ॥"**

व यावरून बहिणाबाईने तुकोबांच्या निर्याणाबद्दल ते एकाकाएकी मृत्यू पावले असे म्हटले आहे असे विधान केले आहे.

'संत बहिणाबाईचा गाथा' सं.– बि. ना. कोल्हारकर या पुस्तकातून वरील अभंग घेतल्याचे त्यांनी सांगितले आहे. तसेच बहिणाबाईनी "गुप्तरूप" शब्द न वापरता "मृत्युरूप" शब्दच वापरला आहे हे विसरू नये असे म्हटले आहे.

आता वरील श्री. कोल्हारकर यांचा गाथा चित्रशाळाप्रेसने शके १८४८ त छापला आहे. सदर गाथ्यास सुरवातीस "नजरचुकीने काही अशुद्धे" या नावाखाली शुद्धिपत्र छापले आहे. सदर शुद्धिपत्राचे पान काही प्रतीत आहे तर काहींत घालणेचे विसरलेले दिसते. आवृत्ती तीच पण प्रकार असा झाला आहे! मजजवळच्या छापील प्रतीत सदर शुद्धिपत्राचे पान नाही पण देहूस गेलो असता तेथील तुकोबांच्या वंशजापैकी श्री. श्रीधरबुवा गोसावी भेटले व त्यानी तीच आवृत्ती मला दाखविली. त्यामध्ये शुद्धिपत्राचे वरीलप्रमाणे छापील पान दृष्टीस पडले. त्यात या अभंगातील दोन दुरुस्त्या दिल्या होत्या "तुकारामा" ऐवजी "तुकाराम" व मृत्यूरूप" ऐवजी "गुप्तरूपे". यावरून बहिणाबाईच्या अभंगातील मूळ शब्द "गुप्तरूपे" असाच आहे.

श्रीसकलसंतगाथा हा पूर्वी रा. आवटे यांनी छापला होता. त्याची दुसरी आवृत्ती श्री. का. अ. जोशी यांचे संपादकत्वाखाली १९६७ त प्रसिद्ध झाली आहे. तिच्या द्वितीय खंडात बहिणाबाईचे अभंग छापले आहेत. त्यात वरील अभंग छापला असून त्यात "गुप्तरूपे" ऐवजी "गुरुरूपे" असा पाठ दिला आहे. हा पाठ कोणत्या मूळपोथीवरून दिला त्याचा उल्लेख नाही.

वरील हकीकतीवरून "मृत्युरूप" हा पाठ चुकीचा आहे हे स्पष्ट आहे. अर्थात् चुकीच्या पाठावरून केलेले अनुमानही चुकीचेच आहे. श्री. बेंद्रे यांनी पूर्वी तुकाराम महाराजांचे संत-सांगाती" या पुस्तकातील बहिणाबाईबद्दलच्या प्रकरणात हीच चुकीच्या पाठाची ओळ उल्लेखली आहे.

बहिणाबाईचे आत्मनिवेदनपर अभंगात वरील अभंग आहे. त्यांचा संदर्भ पहाता या अभंगांचा निर्याणाच्या प्रसंगाशी संबंध दिसत नाही. बहिणाबाई या देहूस आल्यावर तुकोबांना नमस्कार करण्याची उत्कट इच्छा असूनसुद्धा पतीच्या भयाने तसे करता आले नाही. तिच्या चित्तात मात्र तुकोबाच्या चरणांची ओढ राहिली "नमस्कार तया न घडे पतिभये। परि चित्त राहे सदा पायी" या अवस्थेत आनंदवोवरीत बसून बहिणाबाई नेत्र मिटून ध्यानमग्न असता तिला तुकोबांचे दर्शन झाले. त्या अवस्थेत तुकोबांनी तिच्या मस्तकावर हात ठेवून कवित्वाचे वरदान दिले व अकस्मात् ती ध्यानांतील मूर्ती गुप्त झाली! त्यानंतर बहिणाबाईनी इंद्रायणीस जाऊन स्नान केले. पांडुरंगमूर्तीचे दर्शन घेतले व तेथेच असलेल्या तुकोबांना प्रत्यक्ष वंदन करुन आपल्या बिऱ्हाडास त्या परत आल्याचे वर्णन केले आहे.

घेतले दर्शन पांडुरंग मूर्ती।
तंव झाली स्फूर्ती बदावया ॥
तुकोबासी तेथें करुनी नमस्कार।
आले मी सत्वर बिऱ्हाडासी ॥

–भा. पं. बहिरट.

## पुस्तक परीक्षण –

**लोकहितवादीकृत निबंधसंग्रह**
(शताब्दी द्वितीयावृत्ती १९६७)
संपादक : अ. का. प्रियोळकर.
प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४.
पृ. ६८+५८८, किं. रु. १५.

समानधर्मा लाभण्यासारखे भाग्य नाही. त्यामुळे समाधान मिळते. त्याची गोडी फार निराळी असते. अवघ्या २७ वर्षात मुंबईतल्या मुंबईत मला समानधर्मा लाभला, भवभूतीप्रमाणे निरवधि कालावर किंवा विपुला पृथ्वीवर हवाला देण्याचे कारण पडले नाही. हे भाग्य नव्हे का ? शिळाप्रेसवरील निबंधसंग्रहातील **शतपत्रे** तेवढी **नकलून** प्रसिद्ध करण्याची माझी इच्छा उषा प्रकाशकांनी पुरी केली होती ( स. १९४० ). श्री. प्रियोळकर संपादित निबंधसंग्रहाची शत-सांवत्सरिक दुसरी आवृत्ती आज परीक्षणासाठी हाती आल्याने समानधर्मा लाभल्याचे अपूर्व समाधान माझ्या वाट्यास आले. प्रा. इनामदार यांनी कॉंटिनेंटल प्रकाशनासाठी शतपत्रांची नवी आवृत्ती काढली. (स. १९६०) तेव्हाही मला समाधान वाटले. परंतु श्री. प्रियोळकरांच्या आणि माझ्या प्रयत्नात साम्य अधिक आहे – आम्ही उभयतांनी शिळाप्रेसवरील आवृत्तीवरुन लोकहितवादींचे लिखाण उपलब्ध करुन दिले आहे. मी संपादिलेल्या शतपत्रांची दुसरी आवृत्ती सिटी बुक डेपोने काढली (स. १९६३).

श्री. प्रियोळकरांच्या संपादनातले खास वैशिष्ट्य म्हणजे " संहितेबद्दल आग्रह. " शिळाप्रेसवर छापलेले होते तसेच शुद्धाशुद्ध कायम ठेवण्याबद्दल त्यांचा कटाक्ष कितपत समर्थनीय आहे, कोण जाणे – पण त्यांनी त्या दृष्टीने " संहिता " शुद्ध (?) ठेवण्याचा कसून प्रयत्न केला आहे. संशोधन-पद्धतीने अशा जुन्या लिखाणात फरक कितपत " चालतात " याचाही खुलासा " माझ्या जुन्या " ग्रंथातील आधारावरुन ( दमयंती–स्वयंवर स. १९३५) त्यांनी केला आहे.

लोकहितवादींचे मोडी अक्षर व सही, स. १८६६ च्या निबंधसंग्रहाचे शिळाप्रेसवरचे मलपृष्ठ, त्यांचा जुना फोटो, ही ह्या पुस्तकाची नवी वैशिष्टचे होत. गोपाळराव हरि देशमुख– व्यक्ति, वाङ्मय व विचार – म्हणून विस्तृत विवेचन श्री. प्रियोळकरांनी लिहिले. चरित्रविषयक पुष्कळ माहिती साधार पुरविली. त्यांच्या सरकारी नोकरीचा साद्यंत तपशील सांगितला; न्याय० रानडे व लोकहितवादी यांचे आपसातले प्रेमळ सहकारीपणाचे नाते व्यक्त होणारी माहिती उताऱ्यासह दिली आणि गोपाळरावांचा वंश-विस्तारही शोधला. लोकहितवादींच्या ग्रंथसंभाराचे वर्णन टिपणींसह केले आहे. धर्मविषयक मते, इंग्रजी राज्याचे मोल - शाप की वरदान अशा स्वरूपात सांगितल्यावर श्री. प्रियोळकरांनी लोक-हितवादींच्या स्वभावातील काही विशेष सांगून हे प्रास्ताविक विवेचन संपविले आहे (पृ. १-६८). निबंधांचा अनुक्रम पृष्ठवार न देता तो अकार-विल्हेने दिल्यामुळे थोडी सोय, किंचित् गैरसोय झाली. पण सूचीचे काम त्यामुळे भागले नाही.

शतपत्रे (पृ. १-२६७) हा पहिला भाग आणि इतर निबंध (पृ. २७१-५८५) हा दुसरा भाग मिळून १९५ निबंध या संग्रहात आले. पैकी पहिले १०८ हे (शतपत्रांपैकी) साप्ताहिकात नेमाने प्रसिद्ध होणारे, म्हणून त्यांचा विस्तार थोडा होता. पुढील ८७ निबंध हे एक एक विषय पुरा करण्यासाठी लिहिले असल्याने त्यांचा विस्तार थोडा वाढला. त्यातील विषयांची विविधता थक्क करुन सोडणारी आहे. मात्र प्रत्येकात माहिती ठासून भरलेली असल्याने त्यांचे महत्त्व आजही ( शे-सव्वाशे वर्षांनंतरही ) कमी झालेले नाही.

हिंदुधर्म १५ निबंध ( नं. १५१-६५ )
कायदा १५ निबंध ( नं. १८१-९५ )

हे सलग छापलेले छोटे " निबंध संग्रह " होत. ह्याखेरीज हिंदुधर्मातील अनेक बाबीसंबंधाने वेगळे निबंध आहेतच. मुसलमान, पारशी, शीक (=सिख), इस्रायल, वारकरी पंथ यांचे स्वतंत्र निबंध आहेत. विवाह-पुर्नविवाह यासंबंधी १७, ब्राह्मण-भट यांबद्दल

२१ इत्यादी विषयवारी ढोबळ आहे. पण शिंदे होळकर, गायकवाड, निजाम, सातारकर छत्रपती इत्यादिकांचा वृत्तांत, संगीत, नादविद्या, महाराष्ट्र भाषा, शाक्त मार्ग, गाई व बैल, डोले करण्याची चाल, छापण्याची कला इत्यादी निबंधांबरोबरच इंग्रजी राज्य, इंग्रज लोक, त्यांचा कायदा, राजकीय विचार, राज्यसुधारणा ह्या विषयांसंबंधी स्पष्ट मते लोकहितवादींनी मांडली.

हा विषयविस्तार आणि माहितीची पखरण पाहून लोकहितवादींच्या वाचनाचे व्यापक क्षेत्र कळते. हे विषय वाचकांपुढे मांडण्याचा त्यांचा हेतु स्पष्ट होतो – बावनकशी तळमळ समजते. त्यांच्या द्रष्टेपणाचे कौतुक वाटते. ब्रिटिशांना येथील लोक "चालते व्हा" म्हणतील; अमेरिकेत झाले तसे येथे होईल, आणि आपल्या देशातही पार्लमेंट असावे, ह्या लोकहितवादींच्या आकांक्षा-इच्छा आज सफल झालेल्या दिसतात, म्हणून त्यांचे द्रष्टेपण सिद्ध होते.

## द्रष्टेपणाचे पुरावे

डॉ. आंबेडकरांना लोकहितवादींचे लिखाण मनापासून आवडत असे. त्यांना 'मनुस्मृती' जाळण्याची स्फूर्ती लोकहितवादींनी दिली असावी. कारण धर्मासंबंधी माहिती (नं.१०) यात स्पष्ट इषारा आहे की, ".... युरोपात दुष्ट पुरुषाची 'एफिजी' जाळतात, तशी इकडील प्राणघातक **शास्त्रार्थांची पुस्तके जाळून लोक एक मोठे सत्र करतील आणि म्हणतील की, या श्लोकांनी आम्हांस बुडविले. ते विस्तवात टाका, जळू द्या,** असेही भविष्य या देशात घडेल." (पृ. ४५८)

अनिष्ट रिपोर्ट, पुस्तके, वर्तमानपत्रे जाळण्याच्या हल्लींच्या प्रथेचा हा उगम समजावा काय ?

जागतिक राजकारणासंबंधी देखील लोकहितवादींची भविष्यवाणी तंतोतंत खरी ठरली असल्याने त्यांचा द्रष्टेपणा विशेष उज्वल वाटतो. "राजकीय विचार" –युरोप आणि एशिया हा नं. १४८ चा निबंध (ता. १३-३-१८६४). "**सुधारणेच्या कामीं या ( एशिया ) खंडात या ( हिंदुस्थान ) देशाचा पहिला नंबर होईल यात संशय नाही ..... या खंडातील जर्जर झालेले देश लौकरच युरोपाच्या स्वाधीन होतील...... हिंदुस्थानातील लोक अगोदर श्रेष्ठपणा पावतील.** यात संशय दिसत नाही." (पृ. ४१७)

यावावत लोकहितवादींचा आपल्या दृष्टीवर दांडगा विश्वास दिसतो. एशिया खंड लवकरच जिंकले जाईल हे स्पष्ट बजावून ते म्हणतात: "...याचे (एशियाचे) पुन्हा युरोपियनांचे हातून उपनयन होऊन ते शहाणे होणार आहे हे आमचे भविष्य खचित आहे....एशिया खंडात हिंदुस्थान ज्ञानाच्या रस्त्यावर आले आहे..... आपण इंग्लंडाच्या जवळ जाऊ तितके चांगले आहे" (पृ. ४१९)

इंग्लंडबद्दल आदर आणि भारतीय भविष्याबद्दल उज्ज्वल आशावाद सत्पात्री होता– रास्त होता, असे आता स्पष्ट म्हणता येते. जपानचा अपवाद थोडा नजरेआड केल्यास शंभरवर्षापल्याडचे भविष्य लोकहितवादींनी अचुक वर्तविले होते, ही केवढी कौतुकाची बाब !!

लोकहितवादींच्या कर्तबगारीचे यथार्थ मोजमाप करण्यासाठी हा निबंधसंग्रह खास उपयोगी आहे एवढी शिफारस श्री. प्रियोळकरांच्या प्रयत्नाबाबत पुरेशी आहे.

— —

आता संपादकीय धोरणाबद्दल थोडी चर्चा करणे क्रमप्राप्त आहे. शे–सवाशे वर्षापूर्वीचे लिखाण वाचून त्याचा यथायोग्य परिणाम व्हावा असा हेतु असेल तर ह्या निबंधसंग्रहास जागोजाग टीपा पाहिजे होत्या. टीपांच्या मदतीशिवाय पुष्कळ प्रतिपादन समजण्यासारखे नाही. "शतसांवत्सरिक आवृत्ती छापली" एवढ्या शपथेसाठी काही हा ग्रंथ छापला नसावा; यासाठीच साहित्य-संस्कृति मंडळाने अनुदान दिले नसावे. ग्रंथाची उपयुक्तता वाढण्यासाठी टीपांची, कठिण शब्दांच्या अर्थांची, गरज अवश्य होती. विशेषतः त्या वेळच्या मर्यादित माहितीनुसार लोकहितवादींच्या लिखाणात काही विपर्यस्त माहिती आली– तर ती तरी दुरुस्त करणारी टीप





अनुक्रमणिका

## पुस्तक परीक्षण –

**लोकहितवादीकृत निबंधसंग्रह**
(शताब्दी द्वितीयावृत्ती १९६७)
संपादक : अ. का. प्रियोळकर.
प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४.
पृ. ६८+५८८, किं. रु. १५.

समानधर्मा लाभण्यासारखे भाग्य नाही. त्यामुळे समाधान मिळते. त्याची गोडी फार निराळी असते. अवघ्या २७ वर्षात मुंबईतल्या मुंबईत मला समानधर्मा लाभला, भवभूतीप्रमाणे निरवधि कालावर किंवा विपुला पृथ्वीवर हवाला देण्याचे कारण पडले नाही. हे भाग्य नव्हे का? शिळाप्रेसवरील निबंधसंग्रहातील **शतपत्रे** तेवढी नकलून प्रसिद्ध करण्याची माझी इच्छा उषा प्रकाशकांनी पुरी केली होती ( स. १९४० ). श्री. प्रियोळकर संपादित निबंधसंग्रहाची शत-सांवत्सरिक दुसरी आवृत्ती आज परीक्षणासाठी हाती आल्याने समानधर्मा लाभल्याचे अपूर्व समाधान माझ्या वाट्यास आले. प्रा. इनामदार यांनी काँटिनेंटल प्रकाशनासाठी शतपत्रांची नवी आवृत्ती काढली. (स. १९६०) तेव्हाही मला समाधान वाटले. परंतु श्री. प्रियोळकरांच्या आणि माझ्या प्रयत्नात साम्य अधिक आहे – आम्ही उभयतांनी शिळाप्रेसवरील आवृत्तीवरून लोकहितवादींचे लिखाण उपलब्ध करून दिले आहे. मी संपादिलेल्या शतपत्रांची दुसरी आवृत्ती सिटी बुक डेपोने काढली (स. १९६३).

श्री. प्रियोळकरांच्या संपादनातले खास वैशिष्टय म्हणजे "संहितेबद्दल आग्रह." शिळाप्रेसवर छापलेले होते तसेच शुद्धाशुद्ध कायम ठेवण्याबद्दल त्यांचा कटाक्ष कितपत समर्थनीय आहे, कोण जाणे – पण त्यांनी त्या दृष्टीने "संहिता" शुद्ध(?) ठेवण्याचा कसून प्रयत्न केला आहे. संशोधन-पद्धतीने अशा जुन्या लिखाणात फरक कितपत "चालतात" याचाही खुलासा "माझ्या जुन्या" ग्रंथातील आधारावरून ( दमयंती–स्वयंवर स. १९३५) त्यांनी केला आहे.

लोकहितवादींचे मोडी अक्षर व सही, स. १८६६ च्या निबंधसंग्रहाचे शिळाप्रेसवरचे मलपृष्ठ, त्यांचा जुना फोटो, ही ह्या पुस्तकाची नवी वैशिष्टये होत. गोपाळराव हरि देशमुख– व्यक्ति, वाङ्मय व विचार – म्हणून विस्तृत विवेचन श्री. प्रियोळकरांनी लिहिले. चरित्रविषयक पुष्कळ माहिती साधार पुरविली. त्यांच्या सरकारी नोकरीचा साद्यंत तपशील सांगितला; न्याय० रानडे व लोकहितवादी यांचे आपसातले प्रेमळ सहकारीपणाचे नाते व्यक्त होणारी माहिती उताऱ्यासह दिली आणि गोपाळरावांचा वंश-विस्तारही शोधला. लोकहितवादींच्या ग्रंथसंभाराचे वर्णन टिपणींसह केले आहे. धर्मविषयक मते, इंग्रजी राज्याचे मोल - शाप की वरदान अशा स्वरूपात सांगितल्यावर श्री. प्रियोळकरांनी लोक-हितवादींच्या स्वभावातील काही विशेष सांगून हे प्रास्ताविक विवेचन संपविले आहे (पृ. १-६८). निबंधांचा अनुक्रम पृष्ठवार न देता तो अकार-विल्हेने दिल्यामुळे थोडी सोय, किंचित् गैरसोय झाली. पण सूचीचे काम त्यामुळे भागले नाही.

शतपत्रे (पृ. १-२६७) हा पहिला भाग आणि इतर निबंध (पृ. २७१-५८५) हा दुसरा भाग मिळून १९५ निबंध या संग्रहात आले. पैकी पहिले १०८ हे (शतपत्रांपैकी) साप्ताहिकात नेमाने प्रसिद्ध होणारे, म्हणून त्यांचा विस्तार थोडा होता. पुढील ८७ निबंध हे एक एक विषय पुरा करण्यासाठी लिहिले असल्याने त्यांचा विस्तार थोडा वाढला. त्यातील विषयांची विविधता थक्क करून सोडणारी आहे. मात्र प्रत्येकात माहिती ठासून भरलेली असल्याने त्यांचे महत्त्व आजही ( शे-सव्वाशे वर्षांनंतरही ) कमी झालेले नाही.

हिंदुधर्म १५ निबंध ( नं. १५१-६५ )
कायदा १५ निबंध ( नं. १८१-९५ )

हे सलग छापलेले छोटे "निबंध संग्रह" होत. ह्याखेरीज हिंदुधर्मातील अनेक बाबीसंबंधाने वेगळे निबंध आहेतच. मुसलमान, पारशी, शीक (=सिख), इस्रायल, वारकरी पंथ यांचे स्वतंत्र निबंध आहेत. विवाह-पुनर्विवाह यासंबंधी १७, ब्राह्मण-भट यांबद्दल

२१ इत्यादी विषयवारी ढोबळ आहे. पण शिंदे होळकर, गायकवाड, निजाम, सातारकर छत्रपती इत्यादिकांचा वृत्तांत, संगीत, नादविद्या, महाराष्ट्र भाषा, शाक्त मार्ग, गाई व बैल, डोले करण्याची चाल, छापण्याची कला इत्यादी निबंधांबरोबरच इंग्रजी राज्य, इंग्रज लोक, त्यांचा कायदा, राजकीय विचार, राज्यसुधारणा ह्या विषयांसंबंधी स्पष्ट मते लोकहितवादींनी मांडली.

हा विषयविस्तार आणि माहितीची पखरण पाहून लोकहितवादींच्या वाचनाचे व्यापक क्षेत्र कळते. हे विषय वाचकांपुढे मांडण्याचा त्यांचा हेतु स्पष्ट होतो – बावनकशी तळमळ समजते. त्यांच्या द्रष्टेपणाचे कौतुक वाटते. ब्रिटिशांना येथील लोक "चालते व्हा" म्हणतील; अमेरिकेत झाले तसे येथे होईल, आणि आपल्या देशातही पार्लमेंट असावे, ह्या लोकहितवादींच्या आकांक्षा-इच्छा आज सफल झालेल्या दिसतात, म्हणून त्यांचे द्रष्टेपण सिद्ध होते.

## द्रष्टेपणाचे पुरावे

डॉ. आंबेडकरांना लोकहितवादींचे लिखाण मनापासून आवडत असे. त्यांना 'मनुस्मृती' जाळण्याची स्फूर्ती लोकहितवादींनी दिली असावी. कारण धर्मासंबंधी माहिती (नं.१०) यात स्पष्ट इशारा आहे की, "....युरोपात दुष्ट पुरुषाची 'एफिजी' जाळतात, तशी इकडील प्राणघातक **शास्त्रार्थांची पुस्तके जाळून लोक एक मोठे सत्र करतील आणि म्हणतील की, या श्लोकांनी आम्हांस बुडविले. ते विस्तवात टाका, जळू द्या,** असेही भविष्य या देशात घडेल." (पृ. ४५८)

अनिष्ट रिपोर्ट, पुस्तके, वर्तमानपत्रे जाळण्याच्या हल्लींच्या प्रथेचा हा उगम समजावा काय ?

जागतिक राजकारणासंबंधी देखील लोकहितवादींची भविष्यवाणी तंतोतंत खरी ठरली असल्याने त्यांचा द्रष्टेपणा विशेष उज्वल वाटतो. "राजकीय विचार" –युरोप आणि एशिया हा नं. १४८ चा निबंध (ता. १३-३-१८६४). "**सुधारणेच्या कामीं या (एशिया) खंडात या (हिंदुस्थान) देशाचा पहिला नंबर होईल यात संशय नाही ..... या खंडातील जर्जर झालेले देश लौकरच युरोपाच्या स्वाधीन होतील...... हिंदुस्थानातील लोक अगोदर श्रेष्ठपणा पावतील.** यात संशय दिसत नाही." (पृ. ४१७)

याबाबत लोकहितवादींचा आपल्या दृष्टीवर दांडगा विश्वास दिसतो. एशिया खंड लवकरच जिंकले जाईल हे स्पष्ट बजावून ते म्हणतात : ...याचे (एशियाचे) पुन्हा युरोपियनांचे हातून उपनयन होऊन ते शहाणे होणार आहे हे आमचे भविष्य खचित आहे....एशिया खंडात हिंदुस्थान ज्ञानाच्या रस्त्यावर आले आहे..... आपण इंग्लंडाच्या जवळ जाऊ तितके चांगले आहे" (पृ. ४१९)

इंग्लंडबद्दल आदर आणि भारतीय भविष्याबद्दल उज्ज्वल आशावाद सत्पात्री होता– रास्त होता, असे आता स्पष्ट म्हणता येते. जपानचा अपवाद थोडा नजरेआड केल्यास शंभरवर्षापल्याडचे भविष्य लोकहितवादींनी अचुक वर्तविले होते, ही केवढी कौतुकाची बाब ! !

लोकहितवादींच्या कर्तबगारीचे यथार्थ मोजमाप करण्यासाठी हा निबंधसंग्रह खास उपयोगी आहे एवढी शिफारस श्री. प्रियोळकरांच्या प्रयत्नाबाबत पुरेशी आहे.

-- --

आता संपादकीय धोरणाबद्दल थोडी चर्चा करणे क्रमप्राप्त आहे. शे–सवाशे वर्षापूर्वीचे लिखाण वाचून त्याचा यथायोग्य परिणाम व्हावा असा हेतु असेल तर ह्या निबंधसंग्रहास जागोजाग टीपा पाहिजे होत्या. टीपांच्या मदतीशिवाय पुष्कळ प्रतिपादन समजण्यासारखे नाही. "शतसांवत्सरिक आवृत्ती छापली" एवढ्या शपथेसाठी काही हा ग्रंथ छापला नसावा; यासाठीच साहित्य-संस्कृति मंडळाने अनुदान दिले नसावे. ग्रंथाची उपयुक्तता वाढण्यासाठी टीपांची, कठिण शब्दांच्या अर्थांची, गरज अवश्य होती. विशेषतः त्या वेळच्या मर्यादित माहितीनुसार लोकहितवादींच्या लिखाणात काही विपर्यस्त माहिती आली– तर ती तरी दुरुस्त करणारी टीप

लिहिणे आवश्यक होते. नाही तर इतका "अज्ञानी इतिहास लिहिणारे" म्हणून नव वाचकांची लोकहितवादींबद्दल समजूत झाली तर तिची जबाबदारी कुणाची ?

एकच उदाहरण पहा :– वाक् भट (हे वाग्भट लिहावयास काय हरकत होती ?) अमरसिंह इत्यादी बौध्ध होते. पुढे अशोक राजा झाला. त्याने कुमारिल भट्टाचार्यांच्या मदतीने बौध्धांचा धर्म मोडून पुनरपी ब्राह्मणवर्ग स्थापन केला. ही गोष्ट शंकराचार्यांचे पूर्वी झाली. . . . जैनमत म्हणून बौध्धधर्माचे पोटचा धर्म उत्पन्न झाला. . . (पृ. ३३२)

अशोकाचे शिलालेख वाचता येण्यापूर्वीची ही एकीव माहिती लोकहितवादी लिहीत असावे. एरव्ही, अमरसिंहानंतर, कुमारिलभट्टाचा समकालीन अशोक राजा, बौध्धधर्माचा मोड करतो– असा इतिहास रूढ होता ना. हा अपसमज खोडून न काढता तसाच पुन: छापण्यात मोठा दोष आहे. अशाने लोकहितवादींनाही अन्याय होतो.

मूळ पुस्तक शिळाप्रेसचे, हाताने लिहिल्यागत छापलेले. त्याचे अक्षर सध्याच्या छापील टाईपापेक्षा थोडे मोठे होते. शिवाय त्यावेळी "छेदक" पाडण्याची सोय रूढ नव्हती. परंतु आज छेदकाशिवाय पानेच्या पाने मजकूर तसाच छापण्याचा अट्टाहास समर्थनीय ठरणार नाही. "जसेच्या तसे" छापण्याच्या आग्रहाखातर "निबंध संग्रह" ऑफसेट पद्धतीने (फोटो घेऊन) छापतात तसा छापला नाही ही एक मेहेरबानी समजावी.

कमिसरी (पृ. ५००) शेरांची जुगार (पृ. ४०५ अवज्ञरवर (पृ. ४८७) नानासाहेबी (पृ. ३२५) शिंदेशाही (पृ. ४१९) व्यंकोबाची कानगी वसूल करणारी दासरी (पृ. ४१३) इत्यादिकांचा अर्थ सांगणे जरूर होते. रामप्रसाद, गणेश बावाजी माठे (टे ?), ना. मो. केळकर (पृ. ४३०) महिपतराम रूपाराम, करसनदास मूळजी (पृ.४१५) अशांची माहिती दिल्याखेरीज हा निबंध संग्रह पुनर्मुद्रित करण्याचा हेतु सिद्धीस गेला असे होणार नाही. ब्राह्मण आणि त्यांची विद्या यांजबद्दल लिहिताना खुद्द लोकहितवादींनी अशा "निरर्थक" पाठ करणारांबद्दल किती कठोरपणे लिहिले आहे बरे ? अर्थ न समजता वाचल्याबद्दल तेच उद्गार लागू पडतील. "जे पाठ म्हणतात आणि अर्थ जाणीत नाहीत त्यांसारखे मूर्ख आणि व्यर्थ आयुष्य घालविणारे पृथ्वीत थोडेच असतील" (पृ. ८५)...

अशा जाडच्या ग्रंथराजाला सूची नाही. लोकहितवादींच्या संबंधी झालेल्या साहित्याचा निर्देश नाही. म – भ, घ –ध, व – ब यांचा घोटाळा (मूळात असला तरी) सुधारला नाही. ऋग्वेदाची सूक्ते, अक्षरसंख्या, तपासली नाही (पृ. ३२२) इंग्रजी सज्जनांनी नांवे रूढ पद्धतीने सांगितली नाहीत – अशा अनेक कारणांनी ग्रंथ अपुरा वाटतो. सेलूटिक (पृ. ३३१) हे सेल्टिक पाहिजे; नाउगौंड (पृ. ५०६) ऐवजी नाडगौडा हवे; ताडस (पृ. ५२१) बद्दल ताऊस (=मोर; तौंस असेही लिहितात ते वाद्य) सराद (पृ. ५२१) बद्दल सरोद; मद्य (पृ. ५२३) ऐवजी मेघ; दिंदी (पृ. ५५५) च्या जागी बिंदी, गांज (पृ. ३८२) बद्दल गांडा. . . . अशा साध्या दुरुस्त्या किती म्हणून सुचवाव्या ? ही आपत्ती संपादकांवर ओढवली, कारण त्यांनी शिळाप्रेसमधील "लेखका" वर (आजच्या कंपाझिटरवर) सर्वज्ञतेचा अवस्त्वारोप केला. लोकहितवादींचे लिहिणे वेदवाक्य मानण्याऐवजी त्या अज्ञान 'लेखकांना' संपादकांनी केवढा मान दिला आहे. त्यांनी लिहिताना केलेल्या चुका देखील परमपूज्य मानल्या ! त्या दुरुस्त करण्याचे सामर्थ्य आपणांस नाही अशी समजूत संपादकांची का झाली कळत नाही. एकच शब्द निरनिराळ्या प्रकारे लिहिलेला एकाच पानावर आढळला (शिंहगड, सिंव्हगड पृ. २९१; आशिरवाद, आशीर्वाद पृ. ४३०) तर त्या जुन्या काळच्या "लेखकास" (छापखान्यातील) फारसा दोष देता येणार नाही. कारण तो कुणी पदवीधर, सुशिक्षित, संशोधक वैय्याकरणी नव्हता, पण १०० वर्षानंतर त्या ग्रंथाची नवी आवृत्ती काढताना चुका न सुधारता

छापण्याचे इंगित आम्हास तरी कळत नाही. परवती ( – पर्वती पृ. २९५ ); आउध, अउंद ( =औंध पृ. २८५, २८८ ), गंद्रूर ( =गुंटूर पृ. २८१ )' अलंगीरचा मृत्यू स. १७७७ (=१७०७); अहिल्याबाईचा मृत्यू स. १७८५ (=१७९५) ह्या व असल्या साध्या चुका सुधारल्या असता, टीपात सुचविल्या असत्या तरी संहिता बिघडली नसती.

धर्मसुधारणा (पृ. १६१) या निबंधात एकंदर १६ सूचना आहेत, त्या क्रमवारीने सांगताना चवथे आणि चौथे असा एकच आंकडा चुकून दोनदा आला. म्हणून शेवटी १५ वा आकडा आला. संपादकांनी प्रामाणिकपणे ' कॉपी टु कॉपी ' केली– ' माशी टु माशी ' हुबेहुब उठविली ! !

एकंदरीने पहाता ही निबंधसंग्रहाची शत-सांवत्सरिक आवृत्ती काढताना संपादकांनी जे व्रत आपणांवर लादून घेतले, त्याने वाचकांची सोय साधली नाही, निबंधवाचनाने होणारा लाभ पुष्कळ अंशी कमी झाला. मुख्य म्हणजे लोक-हितवादींवर मोठा अन्याय घडला. त्यांच्या वेळची परिस्थिती लक्षात न घेता, त्यांच्या वेळच्या मुद्रकाने केलेल्या चुका खुद्द लोकहितवादींच्या लेखणीतून स्रवलेले शब्द समजून त्यांना नसते प्रामाण्य दिले. " माझ्या चुका सुधारण्याचा हक्कच कुणाला नाही " असा लोकहितवादींचा आग्रह नसावा. शाळाखात्यात एक (अप) समज रूढ असल्याने भूगोल-पुस्तके न तपासता छापल्यामुळे आमच्या सरकारवर कठिण प्रसंग गुदरला. ही आठवण ताजी असता, वस्तुस्थितीचे नीट आकलन करून न घेता, छपाई तंत्रातली प्रगती दृष्टिआड करून " संहिता शुद्धी " चा आग्रह श्री. प्रियोळकरासारख्यांनी धरावा हे महदाश्चर्य होय ! त्यांचा हा हट्ट पुरविणारे मुद्रक-प्रकाशक लाभले हे त्यांचे केवढे भाग्य ! !

**– श्री. रा. टिकेकर**

# सार-संकलन

## जागतिक साक्षरता

नुकत्याच स्वतंत्र झालेल्या आफ्रिकेतील एका देशातील एका लहानशा मातीच्या झोपडीत टेबलावर ठेवण्याचा एक सुंदर इलेक्ट्रिक दिवा ठेवलेला होता. दिव्याला बल्ब लावलेला होता, प्लग पण होता. पण आसपास कोठेही विद्युत्शक्तीचा पत्ता नव्हता. "मी लिहायला व वाचायला शिकावे म्हणून माझ्या साहेबाने मला हा दिवा बक्षीस दिला आहे" असे मोठ्या दिमाखाने त्या झोपडीतील तरुणाने सांगितले. तो तरुण एका स्वदेशी परत गेलेल्या गौरवर्णी वसाहतवाल्याचा धरगडी होता. या वसाहतीत पूर्वी डिझेलवर चालणारी वीजनिर्माण करणारी यंत्रे होती. पण ज्या इमारतींना ही वीज पुरविली जात असे त्यात सध्या न्यायालये आहेत. हे बक्षीस मोठे विलक्षण तर खरेच. पण हा न पेटवता येणारा दिवा एका विशिष्ट परिस्थितीचे द्योतक होय; त्याचे चिन्ह होय असे म्हणावे लागते. सर्व जगभर असे अनेक न पेटवलेले दिवे पेटविण्याची वाट पहात आहेत. कोटयवधी माणसे साक्षरतेचा दिवा कोणीतरी लावील का याची वाट पहात आहेत. पण साक्षरतेसाठी लागणारी साधने पुरविल्याखेरीज, साक्षरता प्राप्त करुन घेण्याची संधी उपलब्ध करुन दिल्याखेरीज हे शक्य होणार नाही. एक एका माणसाची बौद्धिक शक्ती त्याच्यात ज्योत लावल्याखेरीज समजणे अशक्य आहे.

एखादा माणूस निरक्षर आहे म्हणजे तो मूर्ख आहे असे नव्हे. जगातील अनेक शहाण्या माणसांना लिहिता वाचता येत नाही. भारतातील एखादा निरक्षर खेडूत आपल्या समाजाला कशाची गरज आहे हे तज्ञापेक्षाही जास्त चांगल्याप्रकारे सांगू शकेल. व सुजाण माणसे त्याचे ऐकतीलही. पण त्याचा आवाज त्याच्या स्वतःच्या खेड्याच्या बाहेर पोचणार नाही. त्याला इतरांशी वैचारिक दळणवळण वाढवता येणार नाही. आणि साक्षरतेचा खरा अर्थ हाच होय. मानवजातीचे ज्ञान आत्मसात करण्याची पात्रता अंगी येणे, अनेकांच्या अनुभवाचा उपयोग करुन घेता येणे म्हणजे साक्षर होणे. नुसते लिहिता वाचता येणे म्हणजे साक्षर होणे नव्हे.

जगात, जवळजवळ ७० कोटी लोक, म्हणजे वयात आलेल्या जगाच्या लोकसंख्येच्या निम्मे लोक निरक्षर आहेत. गेल्या वीस वर्षात ही संख्या २ कोटींनी वाढली आहे. संयुक्त राष्ट्र संघात "शंभर प्रदेश" म्हणून ओळखल्या जाणाऱ्या म्हणजे जगाच्या दोन तृतीयांश भागातील अर्ध्याहून अधिक लोकसंख्या १५ वर्षाखालील व्यक्तींची असून त्यांना शिकण्यास पुरेशा शाळा अस्तित्वात नाहीत. हे सर्व प्रदेश मागासलेली राष्ट्रे होत.

## वाढती लोकसंख्या

हे सर्व फुगलेले आकडे लोकसंख्येच्या स्फोटामुळे फुगले आहेत. हा स्फोट जगामधील जननशक्ती एकाएकी वाढल्यामुळे झाला आहे असेही नाही. प्रत्येक जोडपे पूर्वीपेक्षा जास्त मुले निर्माण करीत आहे ( त्यांनी कमी निर्माण केली तर फार बरे होईल) असेही नाही. परंतु बाळंतपणाला टकरा देऊन जास्त मुले जन्माला घालण्यास जास्त जास्त माता जगत आहेत. बालपणाच्या रोगांना बळी न पडता जास्त मुले मोठी होत आहेत व प्रजोत्पादन करण्यास योग्य होऊन जास्त प्रजोत्पादन करीत आहेत. थोडक्यात म्हणजे आधुनिक वैद्यकाच्या साहाय्याने साथीचे संसर्गजन्य रोग यापासूनही माणसाचे संरक्षण केले जात असून दुसऱ्याही अनेक मार्गांनी मृत्युसंख्या कावूत आणली जात आहे. पण रोगप्रतिबंधक किंवा जीव वाचविण्याची औषधे अज्ञानी व दरिद्री जनतेपासून दूर ठेवावी किंवा त्यांना ती मिळू देऊ नये असे कोणासही वाटणे शक्य नाही. त्यामुळे युनिसेफ किंवा डब्ल्यू एच्. ओ सारख्या संघटणांनी रोगप्रतिबंधक

उपायांचा प्रचार करणे साहजिकच आहे. पण यावरोबरच एका जुन्या चीनी म्हणीची आठवण होते. " जो कोणी जीव वाचवतो त्यावर त्या वाचवलेल्या जीवाची जबाबदारी पडते. " या न्यायाने युनिसेफ या संघटणेवर फार मोठी जबाबदारी पडलेली आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर रोगराईपासून व भुकेपासून बाचलेल्या असंख्य बालकांची नातवंडे वाचविण्याची जबाबदारी या संघटनेवर आज येऊन पडलेली आहे. त्यांच्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेबरोबरच त्यांच्या शिक्षणाची फार मोठी जबाबदारी जागतिक संघटणांवर येऊन पडलेली आहे.

## शिक्षणाची भूक

शिक्षणाची भूक ही अन्नाच्या भुकेइतकीच तीव्र आहे, असे अनेक ठिकाणी दृष्टीस पडते. परंतु त्याकरता वातावरण निर्माण करणे जरूर असते. जुन्या पिढीला जर ज्ञानाची चाड असली त्यांना आधुनिक ज्ञान हे मूल्य वाटू लागले तर आपल्या मुलांनी शाळेत जाऊन शिकावे याबद्दल ते उत्सुक असतात. आपल्या रहाणीचे मान सुधारण्यास व आपला उद्योगधंदा सुधारण्यास ज्ञानाचा उपयोग होतो असे त्यांना वाटू लागते. हे वातावरण निर्माण करण्यात युनेस्को या संस्थेने पुढाकार घेतला व त्यास संयुक्त राष्ट्रसंघाने पाठिंबा दिला. यात आरोग्याविषयीचे शिक्षण, लहान मुलांना समतोल आहार देण्याचे शिक्षण, घरगुती अर्थ-व्यवस्थेची पुनर्रचना, चांगली शेती पिकविण्याचे शिक्षण, उत्तम मच्छीमार कशी करावी याचे शिक्षण अशा अनेक गोष्टींचा समावेश करण्यात आलेला आहे. हे शिक्षण देताना त्या त्या प्रदेशा-तील ग्रामीण जनतेचा विश्वास संपादन करण्या-करता अनेक तंत्रांचा उपयोग करावा लागतो. तेथे उपलब्ध व प्रचलित असलेल्या करमणुकींच्या साधनांचा या गोष्टींच्या प्रचारार्थ उत्तम उपयोग करून घेता येतो.

या सर्वांचा परिणाम अपेक्षेपेक्षा जरासा वेगळा झाला. लहान मुलांना शाळेत पाठवण्याकरता तयार करण्यात आलेल्या वातावरणात मोठी माणसेच आपल्यासाठी शाळांची मागणी करू लागली. प्रौढशिक्षणाच्या शाळांची मागणी प्रमाणा-बाहेर वाढू लागली. शाळेची एकच इमारत सकाळी प्राथमिक शाळेसाठी, दुपारी माध्यमिक शाळेसाठी, संध्याकाळी तांत्रिक शिक्षणासाठी व रात्री प्रौढ शिक्षणासाठी वापरण्याची गरज भासू लागली. आसपासच्या अनेक सुशिक्षित मंडळींना काही वेळ तरी शिक्षक बनणे भाग पडू लागले. सर्व धंद्याच्या लोकांना या चळवळीत ओढण्याची गरज निर्माण होऊ लागली. पण सुरवातीचा हा उत्साह सर्वत्र टिकणे कठीण आहे.

## शिक्षकांचा तुटवडा

विकास पावणाऱ्या देशातील परिस्थिती मोठी चमत्कारिक आहे. विसाव्या शतकातील पुढारलेल्या राष्ट्रात मानाचे स्थान मिळविण्याकरिता, विकास-पावलेल्या राष्ट्रातील व आपल्यातील फरक नाहीसा करण्याकरता व आधुनिक जगात सर्वांच्या बरोबरीने रहाण्याकरता, स्वतःच्या दारिद्र्यातून बाहेर पडण्याकरता फार मोठ्या प्रगतशील विद्यार्थिवर्गाची या राष्ट्रांना गरज आहे. ही सर्व नवी राष्ट्रे सार्वत्रिक शिक्षणाची घोषणा करून बसली आहेत. या देशातील प्रत्येक मुलाला शिक्षण मिळविण्याचा हक्क तेथील राज्यघटनेने दिलेला आहे. आणि ते बरोबरही आहे. पण तो हक्क पुरा करण्यास असंख्य शाळांची व शिक्षकांची गरज आहे.

'आधी अंडे की आधी कोंबडे' असा हा प्रश्न आहे. ही सर्व राष्ट्रे गरीब आहेत. त्यांचे राष्ट्रीय उत्पन्न अत्यंत कमी आहे व त्यामुळे त्यातील १५ ते २० टक्के उत्पन्न शिक्षणावर खर्च करूनही पत्ता लगत नाही. कारण लोक-संख्या अफाट आहे; त्यातच प्राथमिकपासून विश्वविद्यालयीन पर्यंत शिक्षणाकरता शिक्षक कसे तयार करावयाचे त्यात प्रयत्न व पैसे यांचा होणारा अपव्यय कसा थांबवावयाचा?

आघाडीच्या विद्यार्थ्यांना सुधारलेल्या देशात पाठवून शिकवून आणण्याचे तंत्र बरेच वेळा अवलंबिले जाते. पण त्यातही बरेच धोके आहेत.

व त्यामुळे या पद्धतीवरील अनेकांचा विश्वास उडू लागला आहे. एकतर त्या त्या राष्ट्रातील असलेल्या परिस्थितीपेक्षा भिन्न परिस्थितीत हे विद्यार्थी शिकविले जातात. त्यांच्या स्वतःच्या देशात उपलब्ध नसलेल्या सोईच्या पार्श्वभूमीवर त्यांना शिक्षण दिले जाते. वैद्यकीय विद्यार्थ्यांचे उदाहरण घेतल्यास ही गोष्ट पटकन लक्षात येईल. अमेरिकन हॉस्पिटलमध्ये उपलब्ध असलेली उपकरणे, यंत्रे, आधुनिक अवजारे, चिकित्सेच्या पद्धती व औषधे मागासलेल्या राष्ट्रातील हॉस्पिटलमध्ये उपलब्ध असणे अशक्य आहे. त्याचा परिणाम म्हणजे हे विद्यार्थी परत जात नाहीत. म्हणजे प्रत्येक मागस राष्ट्राने आपले आपले विद्यार्थी शिकवावे, त्याकरता उच्च शिक्षणाच्या संस्थांवर जास्त खर्च करावा लागणार. त्यासाठी प्राध्यापक व तज्ज्ञ शिक्षक पाहिजेत. भारतात स्वातंत्र्यपूर्व काळात फक्त १८ मेडिकल कॉलेजे होती गेल्या २० वर्षात त्यांची संख्या ८३ वर गेली आहे. शिक्षणाचा दर्जा खालावल असल्यासा नवल ते काय ? उच्च शिक्षणक्षेत्रातील शिक्षकांच्या जागा वाढवणे म्हणजे शिक्षणाचा दर्जा कमी करणे असेच सध्या या राष्ट्रातून होत आहे. नव्याने स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांची प्रतिष्ठा पण अनेक वेळा विकासाच्या आड येत आहे. पहिल्या प्रथम ही राष्ट्रे आपला राष्ट्रध्वज संयुक्तराष्ट्रसंघात फडकावितात, त्यानंतर त्यांचे राष्ट्रगीत तयार होते, तिसरी गोष्ट म्हणजे त्यांची राष्ट्रीय हवाई वहातुक सुरू होते व चौथी गोष्ट म्हणजे त्यांचे अणुशक्ती केन्द्र तयार होते. इंडोनेशियासारख्या राष्ट्राने तर अमेरिका व रशिया या दोन्ही राष्ट्राकडून न्युक्लिअर रिॲक्टर्स मिळविले. पण सर्व देशात पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास करणारे डझन अर्धा डझन विद्यार्थी अस्तित्वात होते.

दक्षिण अमेरिका व आफ्रिका या दोन भूखंडांचे उदाहरण घेतल्यास दक्षिण अमेरिकेत नव्याने तयार झालेले असे नवे राष्ट्र नाही. पण काळ्या आफ्रिकेची १९४५ साली संयुक्त राष्ट्रसंघात फक्त ४ निशाणे फडकत होती ती आज ३७ आहेत. त्यातील ३१ काळी आहेत. या सर्वांचे शैक्षणिक प्रश्न एक आहेत त्यावद्दल उपलब्ध सोयी-गैरसोई सारख्याच आहेत.

लॅटीन अमेरिकेची लोकसंख्या २२.५ कोटी आहे. १९५६ साली दीड कोट मुलांना शाळा नव्हत्या. १९५७ साली युनेस्कोने सॅनडिगो-चिली येथे सर्व लॅटीन अमेरिकेकरता योजना आखण्याकरता प्रादेशिक संस्था स्थापन केली. ज्ञानाच्या सर्व शाखातून शिक्षक निर्माण करून शाळा बांधणे वगैरे कामास सुरुवात केली. या संस्थेने राष्ट्रीय उत्पन्नातील चार टक्के उत्पन्न शिक्षणावर खर्च करावे असे सुचविले. बहुतेक सर्व राष्ट्रांनी २५ टक्क्यापर्यंत उत्पन्न शिक्षणावर खर्च करण्याचे ठरविले. पण या काळात लोकसंख्या ३ टक्क्यांनी वाढत राहिली. त्यामुळे शिक्षणातील दृश्य प्रगती म्हणण्यासारखी झाली नाही. शाळेत जाणाऱ्या मुलांची संख्या १.१ कोटीने वाढली. या काळात ३८०००० नवे शिक्षक तयार झाले. ७३००० नव्या शाळा व ३००० शिक्षकांची कॉलेजे उघडण्यात आली. तरीसुद्धा अर्ध्याहून अधिक शिक्षक पदवीशिवायच शिकवीत आहेत.

## शाळेत न जाणारी मुले

मुलांची नावे शाळेत घालणे सोपे आहे. पण त्यांचेकडून अभ्यासक्रम पुरा करून घेणे कठीण आहे. लॅटीन अमेरिकेत फक्त २० टक्के मुले हा अभ्यासक्रम पुरा करतात असे दिसून आले आहे. दोन वर्षापेक्षा जास्त दिवस शाळेत रहाणारी मुले फारच थोडी आहेत. त्याची कारणे अनेक आहेत. अगदी लहान वयातील मुलांना कामाला लावण्याची पद्धती सर्वत्र आहे. वडील माणसांचे मुलांचे शिक्षणाकडे दुर्लक्ष आहे, शाळेच्या वेळा जमत नाहीत व परीक्षा घेण्याच्या पद्धती मुलांच्या विरोधी आहेत, मुलांना शिकविण्याची कल्पना या प्रदेशात रुजलेली नाही आणि तरीसुद्धा दुसऱ्या बाजूला प्रौढ शिक्षणाची वाढती मागणी दिसून येते. वाया गेलेली संधी पुन्हा मिळविण्याची धडपड दिसते. पण लहान मुलांना मात्र मिळत असलेली संधी घेऊ देण्याची कोशीस केली जात

नाहीं. आफ्रिकेत हीच परिस्थिती आहे. मध्यपूर्वेत पण हेच चालू आहे.

हा जागतिक प्रश्न आहे. तो सर्व जगाला लांच्छनास्पद आहे. मागस राष्ट्राची सरकारे तो सोडवू शकणार नाहीत, त्यांच्या ते आवाक्या बाहेरचा आहे. लोकांना हुन्नर शिकवण्यापूर्वी त्यांना शिक्षण देण्याची गरज आहे याची जाणीव जागतिक बँक व संयुक्त राष्ट्रसंघाच्या स्पेशल फंडाने ओळखली आहे. हुन्नर शिकविणे व शिक्षण देणे यातील फरक पुष्कळ वेळा विसरला जातो. शिक्षणाने माणसाचे व्यक्तिमत्त्व विकास पावते, त्याच्यातील सर्जनशीलता जागृत होते त्याचेत सांस्कृतिक मूल्ये निर्माण होतात. त्याचे व्यक्तिमत्त्व बाहेर खेचले जाते ( Education is drawing out ) नुसते हुन्नरी शिक्षण देणे म्हणजे एखाद्या कॉम्प्युटरमध्ये माहिती भरणे होय. सामान्य माणसाला लिहायला व वाचायला न शिकविता अनेक तऱ्हेचीं यंत्रे चालवण्याचे कसब शिकवणे शक्य आहे. पण अशा रीतीने नुसते हुन्नर शिकलेल्या जनतेवर राष्ट्राची भावी प्रगती उभारता येत नाही. अमेरिकेत वसाहती करणाऱ्या सुरवातीच्या लोकांनी हे ओळखले व शेती व शेतीबरोबरच त्यांनीं कॉलेजे सुरू केली. आपल्या मुलांच्या शिक्षणाचीं सोय केली त्याच वेळी चंद्रावर जाणाऱ्या आधुनिक शास्त्रज्ञांच्या शिक्षणाचा त्यांनी पाया घातला. म्हणूनच हुन्नराचा पाया शिक्षण पाहिजे तरच समाज मूळ धरू शकतो. काहीं काळ फुलणाऱ्या झाडासारखा बीज तयार न करता मरून जात नाही, तर खोलवर मुळे गेलेल्या प्रचंड वृक्षासारखा असंख्य बीजे तयार करून आपल्या वंशाच्या विस्ताराचा व भरभराटीचा भक्कम पाया घालतो.

—दि रोटेरिअन इंटरनॅशनल, ऑक्टोबर १९६७.

## १९६८ – लिंडन जॉन्सन वर्ष

१९६८ हे वर्ष लिंडन जॉन्सन वर्ष ठरणार आहे. या वर्षी पुढील पिढीचे जागतिक घडामोडीत काय स्थान राहील हें अमेरिकेला नक्की करावे लागेल. अमेरिका पूर्वाभिमुख राहून अटलांटिकच्या अवतिभोवती थोड्याशा प्रदेशावर आपले लक्ष केन्द्रित करणार की आशियातील अनेक जबाबदाऱ्या पार पाडण्याचाही त्यांचा विचार आहे हे नक्की होईल. त्यामुळे या वेळच्या अध्यक्षीय निवडणूक-प्रचारास भलतेच महत्त्व येणार आहे. १९४० साली अमेरिकन जनतेने रुझवेल्टला तिसऱ्यांदा निवडून देऊन हिटलरशी सामना द्यावयाचे ठरवले त्या निर्णयाइतकाच महत्त्वाचा निर्णय यावेळी अमेरिकन जनतेला घ्यावा लागणार आहे.

### विश्वलक्षी माणूस

जॉन्सनची भूमिका स्पष्ट आहे. तो विश्वलक्षी अमेरिकन आहे. निवडणुकीतील मुख्य प्रश्न पण हाच आहे. जॉन्सन धाडशी व रॅडिकल. अमेरिकन धोरणाचा पुरस्कर्ता आहे. या वर्षाअखेर त्याला आपल्या मताच्या लोकांचा भरपूर पाठिंबा मिळवावा लागेल किंवा अधिकारावरून काढून टाकल्याचा भयंकर अपमान सहन करावा लागेल. हर्बर हूवर यांना अध्यक्षपदावरून दूर केले होते पण त्याचे कारण अमेरिकेचे आर्थिक जीवन ढासळण्यास त्यांचे धोरण कारणीभूत झाले होते. जॉन्सनच्या बाबतीत ते कारण होऊ शकत नाहीं. पण अमेरिकेला, जगात आपले स्थान काय असावे याबद्दलच्या त्यांच्या कल्पना संमत नाहीत असा त्याचा अर्थ होईल.

जॉन्सनला, रॉकफेलर सोडल्यास फारसा महत्त्वाचा प्रतिस्पर्धी नाहीं. निर्णयशक्ती किंवा कामाचा उरक वा तडफ याचा बाकी सर्वांत अभावच आहे. नेतृत्वाचे गुण थोडेफार रॉकफेलर मध्ये आहेत. पण जॉन्सन स्वतःच्या राजकीय भलितव्याकरता सामना देत असल्यामुळे, प्रतिस्पर्धी कोणीहीं असला तरी सर्वस्व पणाला लावूनच त्यांना निवडणूक लढवावी लागेल.

जॉन्सनची परीक्षा या दृष्टिकोनातून करावी लागेल आणि म्हणूनच हे वर्ष लिंडनवर्ष गणावे लागेल. येत्या दहा महिन्यातील जॉन्सनचे राजकीय वर्तन म्हणजे एखाद्या कसबी कलाकारासारखे होईल. त्यात पोपला दिलेल्या भेटीसारखे निरर्थक प्रसंग असतील किंवा द. व्हिएटनाम व

थायलंडमधील लष्कराला दिलेल्या भेटीसारखे नुसतेच लाक्षणिक समारंभ असतील. काही वेळा बुद्धिवंतांना बोचतील अशाही गोष्टी होतील. जॉन्सन या काळात बेधडक कडक होतील. पण जॉन्सनच्या प्रतिस्पर्ध्यांना जर अध्यक्षीय निवडणूक प्रचार म्हणजे शाळेतील वक्तृत्वस्पर्धा वाटली तर मात्र त्यांची कीव करावी लागेल. ही निवडणूक लांबून विशेषतः युरोपमधून अवलोकन करणारांनी जॉन्सनबद्दल गैरसमज करून घेण्याचे कारण नाही. कारण जॉन्सनचे राजकीय तंत्र पुष्कळवेळा ओबड-धोबड असते. तो काहीवेळा भावनेच्या आहारी जातो तर काहीवेळा त्याचे वर्तन दुष्टपणाचे वाटते. पण या सर्वांच्या मागे ध्येयवादाने प्रेरित झालेला, अमेरिकेला सुधारू इच्छिणारा व अमेरिकेच्या जागतिक जबाबदाऱ्यांची जाणीव असलेला एकमार्गी माणूस आहे. त्याच्या चांचेगिरीसारख्या वर्तनाच्या मागे दडलेला भरीव माणूस ओळखला जाणे ही खरी महत्त्वाची गोष्ट आहे.

## प्रतिकूल वातावरण व पार्श्वभूमी

अमेरिकन्सना जॉन्सनची ओळख फार हळू हळू पडत आहे. त्याने राज्याची सूत्रे अत्यन्त वाईट परिस्थितीत हातात घेतली. त्याची परिस्थिती बिजवरासारखी झाली होती. केनेडीवरील अफाट प्रेमानंतर अध्यक्षपदावर येणाऱ्या कोणाबद्दलही ते साशंक राहिले असते. जॉन्सनबद्दल त्यांच्यात तर द्वेषच होता. तो ज्या घटकराज्यातून आला त्या राज्यात अमेरिकन काहीही नाही. टेक्सास राज्य दक्षिण, पश्चिम किंवा उत्तर या कोणत्याच अमेरिकेत बसत नाही व त्यामुळे त्या राज्याबद्दलच सर्व अमेरिकन साशंक असतात. त्याची सर्व पार्श्वभूमीच अमेरिकन्सना न रुचणारी आहे. म्हणून त्याचेबद्दल गैरसमज पण पुष्कळ आहेत. त्याचा परिणाम युरोपवर होऊन तेथेही त्याचेबद्दल साशंक लोकमत तयार झाले. जॉन्सन हा सर्वांच्या परिचयाचा माणूस नाही ही सर्वात मोठी अडचण आहे.

## बिकट प्रसंग

पत्रकार परिषदा व ओपिनिअन पोल यांच्या वर्तनावरून जॉन्सनचे सर्वात वाईट दिवस संपले आहेत असे वाटते. पण तरीसुद्धा सरहद्दीवरून येणारा हा अध्यक्ष सर्व दृष्टीने १९६८ साली महान् अमेरिकन होईल असे वाटत नाही. जॉन्सनच्या मार्गातील हीपण एक मोठी अडचण आहे. त्यातच त्याच्या अध्यक्षपदाच्या काळात अमेरिकेला दोन मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगातून जावे लागले. पहिली आणीबाणी निग्रो आंदोलनाने घेतलेल्या हिंसक वळणाने निर्माण केली. निग्रोंचा प्रश्न हा सर्व दृष्टीने फक्त अमेरिकन प्रश्न आहे. सुधारलेल्या व उद्योगधंद्यात पुढे असलेल्या जगातील कोणत्याही देशात अमेरिकेसारखी स्वतःच्या हक्कांची जाणीव असलेली व ते हक्क बजावण्याचा हक्क सांगण्यास स्वतंत्र असलेली वांशिक अल्पसंख्याक जमात नाही. काहींच्या दृष्टीने अमेरिकन निग्रोंना स्वतंत्र म्हणणे हास्यास्पद ठरेल. पण स्वतःच्या मागण्यांना प्रसिद्धी देण्याचे, स्वतः संघटित होण्याचे व बंदुका मिळविण्याचे स्वातंत्र्य असलेली वांशिक अल्पसंख्याक जमात आज दुसरीकडे अस्तित्वात नाही हे कबूल करावे लागेल. जगातील सर्व वृत्तपत्रात आपल्या वांशिक प्रश्नाचे ठळक मथळे यावेत किंवा सर्व जगभर त्या प्रश्नाची चर्चा व्हावी ही गोष्ट अमेरिकन्सना बरी वाटणारी नव्हती. आणि शेवटी हेही कबूल करावे लागेल की दुसऱ्या कोणत्याही देशापेक्षा जास्त चांगल्या पद्धतीने अमेरिकाच हा प्रश्न सोडवू शकेल. रशियासुद्धा इतर कोणत्याही देशात अशा तऱ्हेचा प्रश्न उपस्थित झाला असता तर निर्वासितांचे थवेच्या थवे स्वतंत्र राष्ट्राकडे धावले असते. समतेची मागणी सर्वत्रच आज ना उद्या केली जाणार आहे. पण अमेरिकेत ही मागणी पुरी करणे सर्वात सोपे जाणार आहे. कारण आजही अल्पसंख्याक आपली मागणी प्रसिद्ध करू शकतात व चित्रवाणीवरून पण या कल्पनेचा प्रचार करू शकतात. जो देश जास्त उदारमतवादी असतो त्याला आपल्या अल्पसंख्याकांच्या स्वातंत्र्याच्या मागण्या दडपून टाकणे शक्य नसते. त्यामुळे या मागण्यांची गळचेपी होण्याची शक्यताही कमी असते. त्याला वाचा फोडणे सहज शक्य असल्यामुळे स्फोटक

परिस्थिती एकदम तयार होत नाही. वांशिक प्रश्न सोडवण्यास अमेरिकन राजकीय यंत्रणा समर्थ आहे असे म्हणावे लागेल.

पण वांशिक प्रश्नावर जॉन्सनचे तारू फुटेल असे वाटत नाही. तो प्रश्न रिपब्लिक पक्षाला जास्त त्रास देईल. जॉन्सनपुढचा मुख्य बिकट प्रश्न व्हिएटनाम आहे. दोन महिन्यापूर्वी अमेरिकन्सना या युद्धाचा कंटाळा आला आहे असे वाटत होते. जुलै ते ऑक्टोबर पर्यंत या युद्धाला पाठिंबा देणाऱ्या लोकांचे प्रमाण ५१ टक्क्यावरून २६ टक्क्यावर घसरले. व शक्य तितक्या लवकर या युद्धातून बाहेर पडावे असे म्हणणारांचे प्रमाण २४ पासून ४४ टक्क्यापर्यंत वाढले. पण नोव्हेंबरपासून पुन्हा लोकमत बदलू लागले आहे असे वाटते. डिसेंबरमध्ये बॉम्ब हल्ले थांबवावे असे म्हणणारांचे प्रमाण फक्त २४ टक्के होते. वाटाघाटी करून तह घडवून आणण्यासाठी आपण (कम्युनिस्ट) जिंकू शकत नाही अशी कम्युनिस्टांची खात्री करून देणे हा एकच उपाय आहे असे ५८ टक्के लोकांचे मत आहे. म्हणजे अमेरिकन लोकमत पुन्हा गेल्या जुलै महिन्यात होते तसेच झाले आहे. हा कदाचित नोव्हेंबरमध्ये मिळालेल्या **लोक ती** व **डाक टो** येथील विजयाचा परिणाम असेल. किंवा युद्ध विरोधी निदर्शकांनी केलेल्या हिंसक कृत्यांचा परिणाम असेल. पण या गोष्टीवर अवलंबून जॉन्सनला अध्यक्षीय निवडणूक लढवता येणार नाही. पण १९६८ च्या सुरवातीस तरी आपल्या व्हिएटनामी धोरणास बहुसंख्य अमेरिकन्सचा पाठिंबा आहे असे धरून चालण्यास हरकत नाही.

हा पाठिंबा असाच राहिला किंवा वाढत गेला तर जॉन्सनने १९६५ साली व्हिएटनाममध्ये आपले लष्कर का पाठवले हे अमेरिकन्सना समजले व त्यांची कारणे लक्षात घेऊन हा पाठिंबा मिळाला असे म्हणावे लागेल. म्हणजेच ही लढाई फक्त एकाच राष्ट्राच्या भवितव्यासाठी लढली जात नाही हे त्यांनी मान्य करणे होय. अमेरिकन लष्कर व्हिएटनाममधून काढून घेतले तर दक्षिण आशियातील इतर सर्व देश पुन्हा संपूर्णपणे मागसलेल्या परिस्थितीत पोचतील असे वाटून जर हा पाठिंबा देण्यात येत असेल तरीसुद्धा जॉन्सनचे धोरण रसातळाला जाईल. पण व्हिएटनाममधील युद्धात एक फार महत्त्वाचा प्रश्न गुंतला असून थायलंड, मलेशिया किंवा भारत यांचे भवितव्य पण त्याच्याशी निगडित आहे याची जाणीव अमेरिकन्सना होऊ लागली आहे असे वाटते. आज व्हिएटनाममध्ये झाले ते उद्या लाओसमध्ये होईल, फार काय सबंध दक्षिण आशियाचे स्वरूपही बदलून जाईल, या जाणिवेतून जॉन्सनला मिळणारा पाठिंबा महत्त्वाचा आहे. काळ्या डगल्याखाली आपली ओळख लपविण्याचा हा डाव अमेरिकन्सनी ओळखण्यास जॉन्सन यांचे बोचक स्पष्टीकरण कारणीभूत झाले असल्यास नवल नाही.

जॉन्सनने सर्व जिंकले असे समजण्याचे कारण नाही. आतापासून नोव्हेंबरपर्यंत धारातीर्थी पडणाऱ्या अमेरिकन्सच्या याद्या मतदान उलटेसुलटे करण्यास समर्थ ठरतील. आणि हेच कम्युनिस्टांचे ध्येय आहे. पण या याद्या जर कल्पनातीत लांब नसतील तर त्यांचा मतदानावर परिणाम होणार नाही व त्यातून दोन निष्कर्ष काढता येतील. एक तर अमेरिका पश्चिमेकडे लक्ष देण्यास तयार असून १९४० ते ५० साली त्यांनी युरोपसाठी जे केले ते आशियासाठी १९७० साली करण्याची त्यांची तयारी आहे. जॉन्सनना पुन्हा अध्यक्षपद याकरताच पाहिजे आहे. व दुसरे म्हणजे जॉन्सनच्या बद्दल असलेले व्यक्तिगत गैरसमज दूर होऊन अमेरिकन मतदारांना आपले धोरण स्पष्ट करणे त्यांना सोपे जाईल. त्यामुळे पुढील अध्यक्षीय निवडणूकप्रचारही सुकर होईल.

—दि इकॉनॉमिस्ट, लंडन, ३०-१२-६७.

# प्राज्ञपाठशालामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (९) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१०) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | | ३.०० |
| (११) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २.५० |
| (१२) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | | २·०० |
| (१३) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) ... ... | | ४·०० |
| (१४) इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | ५·०० |

